


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

## निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

# नवभारत

वर्ष १४ वें ] जुलै १९६१ [ अंक १०



वार्षिक वर्गणी ९ रु. ] [ किरकोळ अंक १ रु.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# राष्ट्रविकास कार्यांत सिमेंटचें महत्त्व

## एकदां, दोनदां, अनेकदां

आपल्या देशाच्या जलसंपत्तीचा विचार करतां आपणाला पाण्याच्या थेंबाचाहि अपव्यय करून चालणार नाहीं. कारण लहरी पावसाची एकदां अवकृपा झाली तर आपलीं उभीं पिकें करपून जातील व आपल्या उद्योगधंद्यांच्या गतिमान चाकांनाहि खीळ बसेल! तथापि, नभोमंडळाकडे दृष्टि लावून बसलेल्या या डौलदार 'कूलिंग टॉवर्स'च्या साह्यानें मात्र आपल्या कारखान्यांना उपलब्ध पाण्याचाच पुनः पुन्हां अनेकदां उपयोग करून घेण्याची किमया साधतां येते!

या 'कूलिंग टॉवर्स'ना मूर्तरूप देणारें सिमेंट कॉंक्रीट हें भारताला वैभवसंपन्न बनविणाऱ्या उद्योगधंद्यांना सहाय्य करणाऱ्या भव्य धरणांच्या व जलविद्युत् योजनांच्या उभारणीसाठीं अत्यंत आवश्यक आहे.

**दि असोसिएटेड सिमेंट कंपनीज लिमिटेड**

दि सिमेंट मार्केटिंग कंपनी ऑफ इंडिया लिमिटेड







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

[अनुक्रमणिका]

प्राज्ञपाठशाळामंडळ वाई, यांचें मासिक

# नवभारत

वर्ष चौदावें — जुलै
अंक दहावा — १९६१

संपादक-मंडळ
आचार्य स. ज. भागवत-श्री. हरि कृष्ण मोहनी-प्रा. वि. म. बेडेकर
प्रा. गोवर्धन पारीख का. संपादक



वार्षिक रु. ९ सहामाही रु. ५ अंकास रु. १

हें मासिक श्री. म. शं. साठे यांनीं दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथें छापून प्रा. वि. म. बेडेकर यांनीं प्राज्ञपाठशाळामंडळ वाई यांचेंकरितां तेथेंच प्रसिद्ध केलें.

पत्रव्यवहाराचा पत्ता : १ संपादकीय : कार्यकारी संपादक, 'नवभारत' मासिक,
'गणेश भुवन' २७६, तेलंग रोड, माटुंगा–मुंबई १९

२ व्यवस्थापकीय : व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
C/o प्राज्ञ प्रेस, वाई ( जि. सातारा )

अनुक्रमणिका

# प्राज्ञपाठशाळामंडळ ग्रंथमाला

| | | |
|---|---|---|
| (१) धर्मकोश– व्यवहारकाण्ड भाग १ ते ३ | | किंमत |
| | साधी बांधणी ... ... ... | ५२–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | ६४–०–० |
| (२) धर्मकोश– उपनिषत्काण्ड भाग १ ते ४ | | |
| | साधी बांधणी ... ... ... | ११०–०–० |
| | कापडी बांधणी ... ... ... | १२६–०–० |
| (३) धर्मकोश– संस्कारकाण्ड भाग १ ला .... | | ४५–०–० |
| (४) मीमांसादर्शन ... ... ... ... | | ३०–०–० |
| (५) मीमांसाकोश ... भाग १ ते ५ | | १६५–०–० |
| (६) कौषीतकिब्राह्मणारण्यकविषयकोश ... ... | | ६–०–० |
| (७) हिंदुधर्माची समीक्षा (लक्ष्मणशास्त्री जोशी) ... | | ५–०–० |
| (८) वैदिक संस्कृतीचा विकास ... .. ... | | ६–०–० |
| (९) नवमानवतावाद ... ... ... ... | | २–८–० |
| (१०) मानवाचा आदर्श ... ... ... ... | | ३–०–० |
| (११) चार्वाक– इतिहास आणि तत्त्वज्ञान (प्रा. सदाशिव आठवले) ... | | ३–०–० |
| (१२) गीता-प्रवेश (डॉ. गो. वि. देवस्थळी) ... | | २–८–० |
| (१३) छत्रपति संभाजी महाराज (श्री. वा. सी. बेंद्रे) .... | | १६–०–० |
| (१४) महाराष्ट्रांतील दुष्काळ व त्यावरील उपाययोजना (श्री. चा. अ. दाभोलकर) .... | | २–०–० |



अनुक्रमणिका

# सार-संकलन

## पास्तरनॅक आणि त्या निमित्तानें

'गेल्या वर्षी बोरिस पास्तरनॅक यांनीं केलेल्या गोइ-तेच्या फॉस्टची दुसरी आवृत्ति प्रकाशित करण्यांत आली. ही दुसरी आवृत्ति अर्थातच वाचकांच्या मागणीमुळेंच काढण्यांत आली असली पाहिजे, कारण ह्या वेळीं पन्नास हजार ( पहिल्या वेळेपेक्षां दुप्पट ) प्रती काढण्यांत आल्या. आणि ह्या दुसऱ्या आवृत्तींत निकोलाय व्हिल्मॉंट यांची प्रदीर्घ प्रस्तावनाहि जरी पुनर्मुद्रित करण्यांत आली असली, तरी पहिल्या आवृत्तींतली प्रस्तावनेचीं शेवटचीं दोन पानें ह्या आवृत्तींत सरळ गाळण्यांत आली आहेत. पहिल्या आवृत्तींतील प्रस्तावनेचा शेवटचा परिच्छेद असा होता –

" बोरिस पास्तरनॅक यांनीं फॉस्टला रशियन काव्यांत एक जिवंत रूप दिलें आहे ... महत्त्वाची सिद्धि प्राप्त झाली आहे– काव्यात्मक रूपांतर, वृत्ताच्या व शैलीच्या ओजाकरितां प्रख्यात असलेल्या रशियन रूपांत फॉस्टचा पुनराविष्कार.'.

'दुसऱ्या आवृत्तींत अंतर्भाव केलेली प्रस्तावना अनुवादकाचा नामोल्लेखहि करीत नाहीं.'

'Novy mir मध्यें इलिया एऱ्हेनबर्ग यांच्या आठवणींचे हप्ते चालू आहेत. ६१ सालच्या दुसऱ्या अंकांत त्यांनीं पास्तरनॅक यांच्या आठवणी सांगितल्या आहेत. 'डॉक्टर झिवागो' प्रकरणानंतर सोव्हिएट वृत्तपत्रांतून पास्तरनॅक यांचें नांव येणें बंद झालें होतें. आतां पास्तरनॅक यांच्या मृत्युनंतर सहा महिन्यांनीं आणि नोबेल पारितोषिकाच्या निर्णयाला तीन वर्षे उलटल्यावर एऱ्हेनबर्ग यांनीं पास्तरनॅक यांचें जें मूल्य-मापन केलें आहे, तें आशयाच्या बाबतींत जरी वाद-ग्रस्त असलें, तरी एरवीं उचित असेंच आहे. 'डॉक्टर झिवागो' वाचून अतोनात वेदना सहन केल्यानंतर आतां एऱ्हेनबर्ग यांनीं पास्तरनॅक यांच्याबद्दल– एक व्यक्ति म्हणून व एक कवि म्हणून –आदर व्यक्त केला आहे. त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, " डॉक्टर झिवागो ही कादंबरी त्यांनीं संपूर्णपणें प्रामाणिकपणें लिहिली, याबद्दल मला संदेह नाहीं. ह्या पुस्तकांत निसर्ग व प्रेमाविषयीं पानेंच्या पानें अद्‌भूत मजकूर आहे. परंतु लेखकानें ज्या गोष्टी स्वतः ऐकल्या वा पाहिल्या नव्हत्या, त्यांना प्रमाणाबाहेर जागा दिली गेली आहे. पुस्तकांत परिशिष्ट म्हणून कांहीं सुंदर कविता जोडण्यांत आल्या आहेत. त्या कवितांचें सौंदर्य ग्रंथांतील गद्यभागाच्या चुका पुसून टाकतें ...'

'एऱ्हेनबर्ग पुढें लिहितात : मातृभूमीची निंदा करण्याचें पास्तरनॅक यांच्या मनांतहि नव्हतें. असें मी ठामपणें म्हणेन. त्यांचें लेखकसंघाचें सदस्यत्व काढून घेण्यांत आलें, ही एक चूकच झाली. कम्युनिस्ट राजवटीचा हिरीरीनें प्रचार करणाऱ्या ह्या साहित्यिकानें पास्तरनॅक यांच्या निर्वासनाविरुद्ध सूर काढून लेखक-संघाचा ठराव निष्परिणाम ठरवला आहे.'

वरील माहिती श्री. A Gaev व श्री. Lolly Lvov यांनीं Bulletin of The Institute for the Study of U. S. S. R. च्या मार्च १९६१ च्या अंकांतून घेतली आहे.

## आफ्रिका-आशिया–एक गट ?

आशिया व आफ्रिका या दोन खंडांतील राष्ट्रांना एका गटांत गोवण्याचे प्रयत्न वारंवार होत असतात. आफ्रो–आशियाई गट खरोखरच अस्तित्वांत आहे काय ? हार्वर्ड विद्यापीठांतील इतिहासाचे प्राध्यापक श्री रेफर्ड डब्ल्यु. लोगन यांनी Current History मासिकाच्या फेब्रुवारी १९६१ च्या अंकांत याविषयीं चर्चा केली आहे.

'सप्टेंबर १९६० ते १५ डिसेंबर १९६० च्या दरम्यान १६ आफ्रिकी राष्ट्रें युनोचे सदस्य बनलीं. आधींचीं नऊ आणि हीं सोळा मिळून पंचवीस आफ्रिकी राष्ट्रें आणि वीस आशियाई राष्ट्रें–अशीं एकूण ४५ राष्ट्रें झालीं. यूनोच्या ९९ सदस्य–राष्ट्रांत ४५ हा आंकडा तसा दुर्लक्षणीय नाहीं. पश्चिमी

राष्ट्रांना विनायासें २/३ मतें मिळवून महत्त्वाचे निर्णय आपल्या बाजूनें करून घेणें, आतां कदाचित् शक्य होणार नाहीं.

यूनोच्या चार्टरप्रमाणें, आंतरराष्ट्रीय शांतता व सुरक्षितता टिकवणें, सुरक्षा-मंडळांतील सदस्यांच्या नियतकालिक निवडणुका घेणें, अर्थ व समाज-मंडळाच्या, तसेंच विश्वस्त मंडळाच्या निवडणुका घेणें, व यूनोंत नव्या राष्ट्रांना प्रवेश देणें-ह्या सर्व महत्त्वाच्या बाबी आहेत. हे आणि चार्टरच्या १८ व्या कलमांत उल्लेखिलेले आणखी कांहीं प्रश्न substantive गणले जातात. बाकी उरलेल्या प्रश्नांना निव्वळ बहुमत असलें तरी चालतें. प्रस्तावाच्या बाजूनें व विरूद्ध पडलेलीं मतें मोजून बहुमत ठरवलें जातें. शिवाय सुरक्षामंडळाच्या कायम सभासदांना-- अमेरिका, रशिया, इंग्लंड, फ्रान्स व राष्ट्रीय चीन या पांच राष्ट्रांना--नव्या सदस्य-राष्ट्रांच्या प्रवेशाबाबत व चार्टरच्या दुरुस्तीबाबत नकाराधिकार दिलेला आहे.

'२८ नोव्हेंबर १९६० रोजीं मॉरिटॅनियानें स्वातंत्र्य जाहीर केलें, परंतु तात्पुरता का होईना रशियानें नकाराधिकार वापरून विरोध केल्यानें मॉरिटॅनियाला ताबडतोब यूनोंत प्रवेश मिळूं शकला नाहीं. रशियानें मॉरिटॅनियाच्या बाबतींत नकाराधिकार वापरण्याचें कारण असें कीं, सुरक्षा-मंडळानें Outer मंगोलियाला यूनोंत प्रवेश नाकारला होता. इतर काळ्या आफ्रिकी राष्ट्रांच्या प्रवेशांच्या वेळींहि रशिया कदाचित् परत नकाराधिकार वापरेल. परंतु त्यामुळें आफ्रो-आशियाई-सोव्हिएट गट होण्याची भीति पुष्कळशी कमी होईल.

'आणखी नऊ काळीं आफ्रिकी राष्ट्रें' लौकरच यूनोंत प्रवेश करणार आहेत. सिएरा लिओन २७ एप्रिलला स्वतंत्र होईल. टांगानिका, युगांडा, केन्या, आणि रुआंडा-उरुंडी हीं राष्ट्रेंहि तोंपर्यंत रांगेंत असतील. ऱ्होडेशिया आणि न्यासालंड फुटून उत्तर ऱ्होडेशिया व न्यासालंड हीं दोन्हीं काळीं राष्ट्रें आपण स्वतंत्र झालों असल्याची घोषणा करणार नाहींतच, असें छातीठोकपणें सांगतां येत नाहीं. सबंध आफ्रिका खंडांत वाहणारे 'बदलाचे वारे' अँगोला व मोझांबिक या पोर्तुगीज वसाहतींना घेरण्याची शक्यता आहे. आणि ह्या नऊ – मॉरिटॅनिया धरून दहा – संभाव्य नव्या सदस्य राष्ट्रांत (ब्रिटिश) वेस्ट इंडीज मिळवावें लागेल. दक्षिण आफ्रिका हें आधींच यूनोचें सदस्य-राष्ट्र आहेच, परंतु तेथेंहि गोऱ्यांचें वर्चस्व किती काळ टिकेल हें सांगणें कठीण आहे. तरी कित्येकांचें म्हणणें असें कीं, सध्यांच्या पंचवीस राष्ट्रांचा मिळून एक आफ्रिकी गट आहे.

'१५ डिसेंबर १९६० पर्यंतच्या घटनांची छाननी करून ह्या विधानांत किती तथ्यांश आहे, तें आतां पाहूं या.

'यूनोच्या तडजोडसमितीचा अहवाल येईतोंपर्यंत कासावुबूंना काँगोचे अध्यक्ष म्हणून यूनोंत बसूं देण्याचा प्रश्न लांबणीवर टाकावा, असा प्रस्ताव दिनांक नऊ नोव्हेंबर रोजीं घनानें मांडला. पंतप्रधान लुमुंबा यांची शिफारस तडजोड-समितीकडून केली जाईल, अशी अपेक्षा होती. घनाच्या प्रस्तावाच्या बाजूनें ४८ मतें पडलीं, ३० विरोधी मतें नोंदवलीं गेलीं, १८ तटस्थ. घनाचा ठराव उचलून धरणाऱ्यांत ९ कम्युनिस्ट राष्ट्रें आणि २९ आफ्रिकी व आशियाई राष्ट्रें होतीं; विरोधी तीस मतांत पश्चिमी राष्ट्रें, ८ फ्रेंच-आफ्रिकी राष्ट्रें व ३ आशियाई राष्ट्रें होतीं; १८ तटस्थ मतें बिगर-कम्युनिस्ट राष्ट्रांचीं होतीं. तेरा फ्रेंच-आफ्रिकी राष्ट्रांपैकीं आठ राष्ट्रांनीं विरोधी मतें नोंदवलीं, ही गोष्ट महत्त्वाची आहे. म्हणजे निव्वळ फ्रेंच-आफ्रिकी राष्ट्रांतच एकवाक्यता नव्हती असें नव्हे, तर काळ्या फ्रेंच-आफ्रिकी राष्ट्रांतहि एकवाक्यता नव्हती.

'१० नोव्हेंबर रोजीं credentials समितींत झालेल्या मतदानांत कासावुबूंचें प्रतिनिधित्व सहा विरुद्ध एक मतांनीं मान्य झालें : पश्चिमी राष्ट्रांच्या बाजूनें असलेल्यांचीं हीं सहा मतें, रशियाचे विरोधी मत, संयुक्त अरब प्रजासत्ताक व मोरोक्को हीं दोन राष्ट्रें तटस्थ राहिलीं.

'हें मतदान झाल्यानंतर, १८ नोव्हेंबर रोजीं घनानें परत आपला पूर्वीचाच ठराव यूनोंत मांडला. ह्यावेळीं ३६ मतें बाजूनें, ५१ मतें विरोधी, व अकरा तटस्थ असें मतदान झालें. पश्चिमी गटानें एकवीस मतें अधिक मिळविलीं; पौर्वात्य गटानें पूर्वीच्या मानानें बारा मतें गमावलीं. तात्पर्य, अमेरिकेनें परत आपलें हुकमी बहुमत आमसभेंत जवळ जवळ प्रस्थापित केलें.



अनुक्रमणिका






" २२ नोव्हेंबर रोजीं शेवटचें मतदान झालें, आणि ह्या खेपेस आवश्यक तें दोन तृतीयांश मत ठरावाला मिळालें: त्रेपन्न विरूद्ध चोवीस, आणि एकोणीस तटस्थ – ह्यांत नायजेरिया होतें. फक्त चार काळ्या आफ्रिकी राष्ट्रांनीं विरोधी मतें दिलीं – घना, गिनी, माली आणि टोगो. बाजूनें मत देणाऱ्यांत पूर्वीच्या नऊ फ्रेंच वसाहती होत्या. पांच काळीं आफ्रिकी राष्ट्रें तटस्थ राहिलीं – मध्य आफ्रिकेचें प्रजासत्ताक, इथिओपिया, लिबेरिया, सोमालिया आणि सुदान. उत्तर आफ्रिकी राष्ट्रांतहि अशीच फूट असल्याचें दिसून आलें. संयुक्त अरबी प्रजासत्ताक व मोरोक्को विरोधकांत सामील झालीं; लिबिया व ट्युनिशिया हीं राष्ट्रें तटस्थ राहिलीं. ह्या अशा मतदानामागें अर्थात् बरींच कारणें दडलेलीं आहेत. परंतु ह्या एका महत्त्वाच्या मुद्द्यावर आफ्रिकी-आशियाई राष्ट्रांचें एकमत झालें नाहीं, हें उघड आहे.

' सुरक्षा-मंडळाची सदस्यसंख्या अकरा ऐवजीं तेरा करावी, व समाज व अर्थ मंडळाची सदस्य-संख्या अठराची चोवीस करावी, असा प्रस्ताव जेव्हां आला, तेव्हां मात्र आफ्रिकी–आशियाई-पौर्वात्य राष्ट्रांचा एक गट झाल्याचें आढळून आलें. आफ्रिका व आशिया या दोन खंडांना सुरक्षा मंडळांत प्रत्येकीं एक जागा देण्याची हमी देण्यांत यावी व निवडणुका तोंपर्यंत स्थगित कराव्यात, असा ठराव ११ नोव्हेंबर रोजीं नायजेरियानें मांडला. पश्चिमी राष्ट्रांनीं ह्या ठरावाला विरोध केला; कारण एक खास राजकीय समिति दोन्ही मंडळांची सदस्य–संख्या वाढवण्याच्या प्रश्नाचा विचार करत होती. लाल चीनला यूनोंत प्रवेश दिला नाहीं तर सदस्यसंख्या वाढवण्याच्या ठरावावर नकाराधिकार वापरण्याची धमकी रशियानें दिली असल्याचा आरोप अमेरिकेनें केला नायजेरियाच्या ठरावाला एक्कावन्न विरुद्ध अडतीस मतें पडलीं, नऊ राष्ट्रें तटस्थ राहिलीं. इतर मतें लक्षांत घेतां लाल चीनच्या यूनो-प्रवेशापेक्षां सुरक्षा-मंडळांत प्रतिनिधित्व मिळवण्याकरितांच यूनोचे आफ्रोआशियाई सदस्य मतदान करत होते, अशी शक्यता आहे. परंतु त्यांची खरी प्रतिक्रिया प्रत्यक्ष मतदानाशिवाय कळणार नाहीं.

' मात्र नोव्हेंबर-डिसेंबरमध्यें पोर्तुगालविरुद्ध आफ्रो-आशियाई राष्ट्रें एकजुटीनें वागलीं. तरी एकंदरीनें पाहतां १५ डिसेंबरपर्यंत तरी यूनोंत आफ्रिकी-आशियाई राष्ट्रांचा भक्कम ' गट ' नव्हता, असाच निष्कर्ष यांतून निघतो. अमेरिकेनें व पश्चिमी राष्ट्रांनीं थंड्या युद्धांतील प्यादीं म्हणून आफ्रिकी राष्ट्रांचा उपयोग केला नाहीं, तर यूनोंत एक आफ्रिकी-आशियाई गट निर्माण होणें टळूं शकेल. '

## कॉंगोच्या महाभारतांतील नवें पर्व

कॉंगोच्या एकराष्ट्रीयत्वाचा प्रश्न मार्च महिन्यांत धसाला लागला. मॅलॅगॅसी प्रजासत्ताकाच्या राजधानींत–टॅनॅनरिव्हमध्यें कॉंगोंतील प्रमुख राजकीय नेत्यांची एक बैठक घेण्यांत आली. त्यांनीं देशाची घटना सुधारून घेतली, देशाचा नकाशा नव्यानें काढला, आणि देशाचें भवितव्य ठरवलें. अध्यक्ष कासावुबू, त्यांचे पंतप्रधान इलिओ, कटांगा प्रांताचे अध्यक्ष शोंबे, दक्षिण कसाई प्रांताचे अध्यक्ष कॅलनजी इत्यादि नेत्यांनीं तेथें जे निर्णय घेतले, त्यांना कोणताहि घटनात्मक आधार नव्हता. वस्तुस्थितीच्या आधारावरच हे निर्णय घेतले गेले. श्री. इम्यॅन्युअल् वॅलरस्टीन यांनीं New Leader साप्ताहिकाच्या २७ मार्च १९६१ च्या अंकांत याविषयीं पुढील विचार व्यक्त केले आहेत.

' कॉंगोचें एक संयुक्त राष्ट्र असावें, कासावुबू हे त्याचे अध्यक्ष असावेत, त्यांच्या हातीं परराष्ट्रीय खातें असावें, कार्यकारी मंडळांत स्वायत्त घटक-राज्यांचे अध्यक्ष असावेत– इत्यादि निर्णय ह्या बैठकींत घेतले गेले. राष्ट्रीय सैन्याचें भवितव्य मात्र अनिश्चितच राहिलें. हे झाले एकमत असलेले मुद्दे. ह्यांना खूपच प्रसिद्धि देण्यांत आली. मतभेद त्या मानानें अंधारांतच राहिले. उदाहरणार्थ : ह्या भावी संयुक्त राष्ट्रांच्या घटक–प्रदेशांची संख्या किती असावी, हा मुद्दा. सध्यांचा सहा हा आंकडा वाढवावा, असें मत बहुसंख्याकांचें होतें. प्रत्यक्ष आंकडा किती ठरला, याबाबतच्या वार्तेंत मेळ नाहीं. बैठकींतील निर्णय निव्वळ वस्तुस्थितीच्या आधारें घेण्यांत आले असल्यानें, बैठक संपल्यावर घाईघाईनें ताबडतोब कित्येक नव्या राज्यांचीं नांवें जाहीर झालीं आहेत. सामान्यतः हा आंकडा वीसापर्यंत जातो. हीं राज्यें टोळ्यांनुसार कल्पिलीं आहेत. मात्र लुआलॅबा



अनुक्रमणिका






हें राज्य ह्या बैठकींत मान्यता मिळवूं शकलें नाहीं. लुआलॅबा हा कटांगाचा उत्तर प्रदेश. तेथें जॅसन सेंडवीच्या पक्षाचें आधिपत्य आहे. कसाई प्रांतांतून पश्चिम बाजुवा तोडून तो कॅलनजींच्या राज्याला जोडण्यांत आला, परंतु शोंबेच्या कटांगांतून पूर्व बाजुवा लुआलॅबाला मात्र जोडण्यांत आला नाहीं. हा धडधडीत अन्याय आहे, हें सुसंगतहि नाहीं. याहिपेक्षां अधिक महत्त्वाचे मतभेदाचे मुद्दे होते. संयुक्त राष्ट्राच्या केंद्रीय शासनाच्या हातीं किती सत्ता असावी हा प्रश्न फक्त कागदावर मांडला गेला, आणि एकमताचा मुखवटा टिकवण्यांत आला.

'कासावुबूंचें भवितव्यहि तसेंच अनिश्चित ठेवलें गेलें आहे. यूनोनें कासावुबूंचें अधिकार मान्य केल्यामुळेंच शोंबे व कॅलनजी यांनीं त्यांचें अध्यक्षपद मान्य केलें. लिओपोल्डव्हिलला परतल्यावर कासावुबूंनीं दक्षिण कसाई व कटांगा परत कॉंगोंत आले म्हणून उत्सव साजरा केला. परंतु परिणामकारक सत्तेचा अभाव ही किंमत त्यांना त्याकरितां द्यावी लागली आहे. केंद्रीय कायदेमंडळ नसलेल्या व घटक राज्यापेक्षां वेगळें कार्यकारी मंडळ नसलेल्या राष्ट्रांत परराष्ट्रीय धोरणाची जबाबदारी ही नेहमींच एक डळमळीत गोष्ट ठरली आहे.

'लुमुंबांचे वारसदार अंत्वान गिझेंगा, हेहि या बैठकीला हजर नव्हते. गिझेंगा यांच्या हेतूंविषयीं वर्तमानपत्रांत रोज रकाने येतात. ह्या सर्व कहाण्या निरपवादपणें लिओपोल्डव्हिल किंवा एलिझबेथव्हिल येथें जन्म घेतात. त्यांत गिझेंगा किंवा त्यांचे लष्करी अधिकारी व्हिक्टर लुंडुला यांच्या तोंडचे शब्द कधींच नसतात. गिझेंगा यांच्या हेतूंबद्दलचें दुसऱ्या कोणाचें तरी मत त्यांत नेहमीं सांगितलें जातें. गिझेंगा टॅनॅनॅरिव्हला गेले नाहींत, आणि हा सर्व एकमती मसुदा त्यांना अमान्य आहे, एवढेंच काय तें आपल्याला ठाऊक आहे. कासावुबू यांचें राष्ट्राध्यक्षपद मान्य करण्यांत गिझेंगा केवळ स्वतःचे कायदेशीर हक्क परत एकदां पुढें मांडत आहेत. ह्या बैठकींत गैरहजर असलेल्या आणखी दोन व्यक्ति म्हणजे जनरल मोबुटू आणि परराष्ट्रमंत्री श्री. बोंबोको. मोबुटूंच्या सैन्याचें महत्त्व बैठकींतील निर्णयांमुळें फारच कमी झालें आहे. शोंबे यांच्याशीं घनिष्ट संबंध ठेवणें श्री. बोंबोको यांना कधींच पसंत नव्हतें; आणि आतां बैठकीनंतर त्यांनीं श्री सेंडवी यांची उत्तर कटांगांत वेगळें राज्य स्थापण्याची मागणी जाहीरपणें उचलून धरली आहे. शिवाय दक्षिण कसाईंत कासावुबूंनीं बऱ्याच राजकीय पुढाऱ्यांचें ( त्यांत कित्येक मोबुटू व बोंबोको यांचे मित्र होते ) शिरकाण केल्यानें त्या दोघांना संताप आलाच आहे.

'सारांश, टॅनॅनॅरिव्हची बैठक कॉंगोची समस्या सोडवूं शकलेली नाहीं. उलट कित्येक नव्या समस्याच त्यामुळें निर्माण झाल्या आहेत.

'तरी ही बैठक अतिशय महत्त्वाची अशी झाली. ही बैठक म्हणजे शोंबे यांचा एक महत्त्वपूर्ण राजकीय विजय, – कारण ते या बैठकीचे निमंत्रक होते. गेल्या जुलैमध्यें कटांगा कॉंगोंतून फुटून निघाला, – त्याच्यावर आतां शिक्कामोर्तब झालें. लुमुंबा किंवा यूनो, कोणीच ही फूट टाळूं शकले नव्हते. यूनोची बळ वापरण्याची तयारी नव्हती, आणि लुमुंबाला तसें करूं देण्यांत आलें नाहीं म्हणून शोंबे यांना जें हवें होतें, तें त्यांना मिळालें आहे. कासावुबूंचा दुबळेपणा वाढला आहे. त्यांचें राष्ट्राध्यक्षत्व ही एक तात्पुरती सवलत आहे. ही सवलत घटक-राज्यें केव्हांहि काढून घेऊं शकतात. आणि मग कासावुबू एका टोळीचे नायक म्हणून उरतील. परत त्यांनीं कॉंगोंत ऐक्य उभारण्याचा प्रयत्न केला, तर त्यांचा जीव धोक्यांत येईल. कारण कासावुबूंची बॅकोंगो ही टोळी लहान-लहान तुकड्यांत विभागलेली आहे, आणि तेथें कासावुबूंचें नेतृत्व अविरोध मानलें जात नाहीं. त्यांचें कार्यक्षेत्र जसजसें संकोच पावूं लागेल, तसतसें आपल्या मागण्या ठामपणें मांडणें त्यांना कठीण जाईल. गिझेंगांची स्थिति फारशी पालटलेली नाहीं. त्यांचे सर्व विरोधक आतां आपसांत समझौता करण्यापर्यंत आले आहेत, आणि कॉंगोच्या ऐक्याच्या बाजूनें व टोळ्यांनुसार देशाच्या नव्या सीमा आंखण्याविरुद्ध उभे राहणारे गिझेंगा एकटेच आहेत. विद्यार्थ्यांचा बराच पाठिंबा त्याला मिळूं शकेल. लुव्हॅनिअम येथील विद्यार्थ्यांनीं टॅनॅनॅरिव्हच्या निर्णयांचा निषेध केला आहे यूनोचें आसनहि आतां कचें झालें आहे. कारण कॉंगोचीं सर्व राज्यें जर स्वतंत्र राहणार










असतील, आणि ह्या प्रत्येक स्वतंत्र राज्याचें जर वेगळें सैन्य राहणार असेल, तर प्रत्येक राज्यच यूनोचें सैन्य आपल्या भूमीवर न आणण्याची मागणी करूं शकेल. यापूर्वींहि ह्या बाबतींत त्यांनीं थोडेंफार यश संपादन केलें होतेंच, आतां त्यांत अधिक परिणाम-कारकता येईल.

'ऐक्य साधणारें कांहींच शिल्लक नसल्यानें व प्रत्येक राज्य केवळ टोळीच्या अनुसारें तयार झाल्यानें स्थैर्य राहण्याची शक्यताहि नष्ट होईल. शिवाय काँगों-तील कोणताहि भूभाग निव्वळ वंशाच्या मुद्द्यावर कायमचा वेगळा काढतां येणार नाहीं. म्हणून, एकदां वांशिक स्वायत्ततेचें तत्त्व मान्य केल्यावर, प्रत्येक उपविभाग आपल्या स्वायत्ततेची मागणी करेल आणि ती सिद्ध करून घेण्याकरितां आसपास साहाय्यक धुंडाळेल.

'अशा परिस्थितींत काँगोंतील अस्थैर्याचा परिणाम अँगोला, उत्तर ऱ्होडेशिया, रुआंडा, युगांडा यांच्या आणि एकंदरीनं सर्वच दक्षिण आफ्रिकेच्या–अस्थैर्यावर होईल. अजून गिझेंगा उठून काँगोच्या एकीकरणाच्या कार्याला सुरवात करणें शक्य आहे पण असें घडण्याची शक्यता फारच कमी आहे.

'यूनोच्या अखंड साहाय्यानें लिओपोल्डव्हिलची संयुक्त सत्ता कांहीं काळ काढूं शकेल. परंतु काँगोंत महत्त्वपूर्ण सामाजिक बदल घडवून आणणें, ह्या सत्तेच्या कुवतीबाहेरचें आहे. त्यामुळें बुद्धिमान् वर्गांत असंतोष सतत वाढतच जाईल. अर्धशिक्षितहि असंतुष्टच असतील. खेडेगांतील शेतकऱ्यांची परिस्थिति–आर्थिक आणि राजकीय ही डळमळीतच असेल. येनान-मध्यें घडलें त्याप्रमाणें काँगोंतहि क्रांतिकारक चळव-ळीला पोषक अशी सामाजिक परिस्थिति तयार होईल. आफ्रिका खंडांत प्रथमच कम्युनिझम् ही एक गंभीर समस्या होईल. ट्युनिशिया गिनीप्रमाणें राष्ट्रला एक-वटणारा प्रबळ पक्ष नसल्यामुळें बाहेरच्या ( कम्युनिस्ट आणि वसाहतवादी ) शक्तींना अटकाव करतां येणार नाहीं. काँगोंत अंदाधुंदी माजेल. आणि मग सुसंघटित शेतकरी–चळवळीकडे सर्वच जण आशेनें पाहूं लागतील. हा कम्युनिझमचा चंचुप्रवेश असेल. अशी परिस्थिति येऊ नये म्हणूनच लुमुंबांनीं आटो-काट प्रयत्न केले. टॅनॅनॅरिव्हच्या बैठकीनें अंतर्गत फूट वाढवली एवढेंच नव्हे, तर उलट दिशेनें होणाऱ्या प्रय-त्नांची शक्यताहि पुरी नष्ट करून टाकली आहे. यूनो, अमेरिका किंवा रशिया यांपैकीं कोणीच असहाय्य बन-लेलें नाहीं, परंतु परिस्थिति समूळ बदलून टाकण्याचें सामर्थ्य कोणांतच नाहीं.

'अमेरिकेसमोर दोन मार्ग मोकळे आहेत. काँगोच्या सभोंवार अंतर्गत एकजूट असलेलीं राष्ट्रें असावींत, असे प्रयत्न करणें. अँगोलाच्या प्रस्तावावरील अमेरि-केचें मत हें एक ह्या दिशेनें टाकलेलें महत्त्वाचें पाऊल होतें. उत्तर ऱ्होडेशिया व रुआंडा यांच्या बाबतींतहि हीच दिशा कायम ठेवली जावी. दुसरें असें, काँगोंत कोठेंहि जरी एकजूट करणारी वृत्ति दिसली, तरी अमे-रिकेनें तिच्या बाजूनें असावें. अर्थात् नजिकच्या काळांत ही शक्यता नाहीं. आतांपर्यंत कम्युनिझम ही आफ्रिकेंतील बलशाली शक्ति नव्हती. टॅनॅनॅरिव्हच्या बैठकीमुळें कम्युनिझमला प्रथमच एक संधी प्राप्त झाली आहे.'

## शस्त्रसंन्यासाचा त्रिफळा

गेल्या सप्टेंबर महिन्यांत क्रुश्चोव्हनें शस्त्रसंन्यासा-विषयीं आपली नवी कल्पना मांडली : शस्त्रसंन्यासाचें निरीक्षण व नियमन करण्याकरितां तीन सदस्यांचें एक मंडळ नेमावें. कम्युनिस्ट गट, स्वतंत्र गट, व तटस्थ राष्ट्रें यांचा एकेक प्रतिनिधि घेऊन हें मंडळ बनवावें व ह्या तीन सदस्यांपैकीं प्रत्येकाला नकार देण्याचा अधि-कार असावा. रशियाच्या ह्या प्रस्तावानंतर आतां अण्वस्त्रांच्या प्रायोगिक स्फोटांना बंदी घालण्याविषयीं विचारविनियम करण्याकरितां जिनिव्हा येथें परिषद् भरत आहे तत्पूर्वी भिन्न भिन्न देशांतील राजकारण-पटु लोकांची ह्यावरील प्रतिक्रिया व्यक्त झालेली आहे.

लंडनच्या 'डेली हेराल्ड'चे राजकीय निरीक्षक, श्री. डब्ल्यू. एन्. एवर यांनीं आपलें मत पुढील-प्रमाणें व्यक्त केलें आहे :

'धोक्याची पहिली सूचना मार्च महिन्यांत आली. नियंत्रण-व्यवस्थेचा सर्व प्रमुख अधिकारी एकच असावा, ह्या प्रस्तावाला रशियानें पूर्वींच दिलेली निःसंदिग्ध संमति अचानक काढून घेण्यांत आली. त्रिपक्षीय नियामक मंडळाचा रशियाचा प्रस्ताव इंग्लंड-अमेरिकेनें मान्य केला नाहीं. कारण त्यामुळें कम्युनिस्ट

प्रतिनिधीस वेळीं-अवेळीं नकाराधिकार वापरून मंडळाच्या कार्यांत खीळ घालतां आली असती. पूर्वी सर्वसंमत झालेल्या योजनेंतहि मतभेदाचे कांहीं मुद्दे होते, पण ते वाटाघाटी करून मिटवितां येण्याजोगे होते. मात्र ह्या नव्या प्रस्तावाबद्दल हातमिळवणी करणें शक्यच नव्हतें. हा प्रस्ताव प्रथम मांडण्यांत आल्यापासून रशियन प्रतिनिधीनें वारंवार त्याचा पुनरुच्चार केला आहे. नुकत्याच श्री. वॉल्टर लिपमन यांना दिलेल्या मुलाखतींतहि क्रुश्चोव्हनें ' याबाबतींत आपण कांहीं झालें तरी माघार घेणार नाहीं, व त्यामुळें अण्वस्त्र-बंदीचा सबंध प्रस्तावच बारगळला तरी बेहेत्तर' असें बजावलें आहे.

' सोव्हिएट रशियाला अण्वस्त्रबंदीच नको आहे, आणि म्हणून ही एक अशक्य कोटींतली मागणी रशियानें केली आहे, अशी भीति कित्येकांनीं व्यक्त केली आहे.

' असें असण्याचें कारण काय ?

' कदाचित् असें असेल, कीं अंतिम निर्णय घेण्याची वेळ येऊन ठेपल्यावर परकीय नियामक सैनिकांना आपल्या भूमीवर पाय टाकूं देणें क्रुश्चोव्हला पटत नसेल. हेरगिरी होण्याची भीति आणि आत्यंतिक गुप्ततेचा सोस ह्या निव्वळ सबबी आहेत. परंतु एकादें वेगळेंच सबळ कारण असूं शकेल. ' मँचेस्टर गार्डियन'चे सोव्हिएट राजकारणाचे तज्ज्ञ वार्ताहर श्री. व्हिक्टर झोर्झा यांना अशी शंका आहे ( व या शंकेला पुरेसे आधार त्यांनीं पुढें मांडले आहेत ) कीं अण्वस्त्र-चांचणी परत सुरु करण्याची कल्पना रशियाच्या लष्करी तज्ज्ञांच्या डोक्यांत असावी.

' गेल्या डिसेंबर महिन्यांत फ्रान्सनें सहारा वाळवंटांत चांचणीस्फोट केला होता. रशियन वृत्तपत्रांनीं त्यावर कडाडून हल्ला केला होता. मात्र ह्या वर्षीच्या एप्रिल महिन्यांत झालेल्या चांचणी-स्फोटाची फक्त त्रोटक बातमी तेवढी ( टीकेविना ) छापण्यांत आली. चांचण्या सुरु करण्याचें मनांत असल्यानें उत्सर्जनाचे धोके जनतेच्या मनावर ठसविण्याचें प्रयोजन रशियन सरकारला आतां वाटत नाहीं काय ?

' रशियानें मनाशीं बांधलेला हिशेब असा असावा : जिनिव्हा परिषद् अयशस्वी झाली कीं, अमेरिका स्वतःला १९५८ सालच्या करारनाम्यांतून सोडवून घेईल, आणि एकतर्फी अस्त्रबंदीला जनमत विरोधी असल्यानें अमेरिकेचे प्रयोग सुरुं होतील. हें एकदां झालें कीं, मग रशिया जगाला असें भासवेल कीं, अमेरिकेच्या हेकट युद्धखोर धोरणामुळें निरुपायानें आपण परत चांचणीस्फोट करूं लागलों आहोंत.

' इंग्लंड व अमेरिकेनें केलेला करारनाम्याचा खर्डा जिनिव्हा परिषदेंत चर्चेला येईल. रशियानें जर त्यावर चर्चा करायचेंहि नाकारलें, तर जिनिव्हा परिषद् कोलमडेल. परिषदेच्या अपयशाची जबाबदारी कोणावर आहे, याबाबत आतां तरी कोणाच्याच मनांत संशय नसावा. '

अमेरिकेतील एक राजकीय निरीक्षक श्री. पॉल एल्. फोर्ड यांनीं आपले विचार असे मांडले आहेत :

' तीन अधिकाऱ्यांचें एक सचिवालय अस्तित्वांत आणून यूनोचे सरचिटणीस श्री. हॅमरशुल्ड यांना पदभ्रष्ट करण्याची जी सूचना श्री. क्रुश्चोव्ह यांनीं मांडली होती, ती श्री. हॅमरशुल्ड यांच्यावरील हल्ल्याचा एक भाग म्हणून गणली जात होती. परंतु ह्या विरोधाचें मूळ कारण याहिपेक्षां खोलवर रुजलेलें आहे. युनो ही जगांतील अतिप्रभावी शक्ति ठरली असून, ती दडपून टाकणें जरूरीचें आहे, असें सोव्हिएट रशियाला वाटत असल्याची एक प्रकारें कबुलीच या सूचनेच्या द्वारें सोविएट रशियानें दिलेली आहे, असें म्हणतां येईल.

' १९४५ मधील विचारसरणीप्रमाणें यूनोनें जगांतील मोठ्या व प्रभावी राष्ट्रांच्या जोडीला लहान राष्ट्रां नाहि बसूं देण्याची व त्यांना सल्ला देण्याचा अधिकार ठेवण्याची तरतूद केली. सुरक्षा मंडळाच्या पांच कायम सभासदांना नकार देण्याचा हक्क ठेवला गेल्यानें सुरक्षा-मंडळच सत्तेचें केंद्र बनलें.

' विशेषतः रशियानेंच ह्या दिशेनें खटपट केली आणि यूनोची जागतिक संघटना उभारली जात असतांना रशियानेंच या अधिकारासंबंधीं आग्रह धरला होता.

' परंतु मोठ्या राष्ट्रांच्या केवळ कच्छपीं लागण्यांतच समाधान मानण्यास लहान राष्ट्रें तयार नव्हतीं, असें

दिसून आलें. याचा परिणाम सुरक्षा-मंडळा ऐवजी आमसभेला महत्त्व देण्यांत झाला. तेथें लहान राष्ट्रें संसदीय कारभारांत आणि राजनीतींत वाढत्या प्रमाणांत व पूर्वींच्या मानानें अधिक महत्त्वांचा भाग घेऊं लागलीं.

' हा फेरबदल होत असतांना यूनोची संघटना अधिक आकर्षक व वजनदार बनली. सुरक्षा-मंडळांच्या सदस्यांना ही वस्तुस्थिति मान्य करावी लागली. ही प्रगति नैसर्गिक असून यूनो हें संघटित जागतिक उपाययोजनेचें साधन ठरलें असल्याचें त्यामुळें सिद्ध होत आहे, असें सुरक्षामंडळाच्या बहुतेक सभासदांनीं कबूल केलें आहे.

तथापि लहान राष्ट्रांची संकलित सत्ता आपल्या उद्दिष्टांना व्यत्ययकारक आहे, असें रशियाला वाटत असल्याचें दिसून येतें. यूनोच्या निर्णयांचें नियंत्रण करण्यास रशिया असमर्थ असल्यानें त्यानें आपल्या टीकेचा रोख यूनोच्या सचिवालयाकडे वळवला.

' त्रिपक्षीय व्यवस्था हा रशियाच्या परराष्ट्रीय धोरणाचा एक ठराविक दृष्टिकोनच होऊन गेल्याचें दिसून येतें व हा दृष्टिकोन जेवढ्या व्यापक क्षेत्रांत उपयोगांत आणतां येईल, तेवढें व्यापक क्षेत्र मिळविण्याचा रशियाचा इरादा आहे. '

## गेल्या वर्षांतील शास्त्रीय सिद्धि

१९६० सालीं शास्त्रीय बाबींत माणसानें गांठलेले कांहीं उत्कर्षबिंदु जॉन मॅडॉक्सनें एका लेखांत ग्रथित केले आहेत.

वरवर पहातां १९६० सालांत शास्त्रीय बाजारांत मंदीच होती. चंद्रापर्यंत मजल कोणीच गांठू शकलें नाहीं. शक्तीचा नवा अमर्याद सांठा सांपडल्याचा दावाहि कोणीं मांडला नाहीं. आइन्स्टीन, किंबहुना न्यूटन, चुकले होते असेंहि कोणीं सिद्ध करूं शकला नाहीं. परीक्षा नळींत जीवन निर्माण करून दाखवण्याचें कसबहि कोणीच प्राप्त करून घेऊं शकले नाहींत. असल्या सनसनाटी गोष्टी घडून आल्या नाहींत, ह्यांत आश्चर्य वाटण्याजोगें कांहींच नाहीं. परंतु तरी गेलें वर्ष वैशिष्ट्यपूर्णच होतें. नवीन शोधांचा प्रत्यक्ष घटनांशीं विशेष संबंध नव्हता,– हेंच तें वैशिष्ट्य. बऱ्याच क्षेत्रांतील कल्पनांचा जुना गोंधळ स्पष्ट झाला आणि हें कसें घडून आलें, याचा पत्ता प्रयोग करणाऱ्या शास्त्रज्ञांना लागलाच नाहीं.

Cosmic किरणांचेंच उदाहरण घ्या. अणूचे हे कण पृथ्वीवर येतात, ते इतक्या प्रचंड शक्तिनिशी कीं, एवढी शक्ति कृत्रिमरीत्या पृथ्वीवर निर्माण करणें शक्य होत नाहीं. वर्षापूर्वी यांबाबतींत डझनभर वेगवेगळे सिद्धांत मांडले गेले होते व त्यांपैकीं सर्वच बरोबर वाटत होते. एकूण लोकांच्या मनांत गोंधळ होता. आतां हा गोंधळ पुष्कळसा कमी झाला आहे. पण तरी पर्याय पूर्वीइतकेंच आहेत. कळलें आहे तें इतकेंच, कीं पृथ्वीवर येणाऱ्या Cosmic किरणांच्या मिश्रणाकरितां अनेक यांत्रिक प्रक्रिया जबाबदार आहेत. तुलनात्मक दृष्ट्या कमी शक्तिमान् असलेले Cosmic किरण सूर्य उत्पन्न करतो आणि फुटलेल्या ताऱ्यांच्या उर्वरित भागांपासून इतर Cosmic किरण तयार होतात. परंतु या पर्यायांमुळें आतां इतर सर्व शक्यता निकालांत निघाल्या आहेत, असें समजण्याचें मात्र कारण नाहीं. कांहींच माहित नसल्यामुळें निराश होण्यापेक्षां अंशतः का होईना उत्तर मिळालें, म्हणून शास्त्रज्ञांना कृतज्ञता वाटते. शास्त्रानें अशी निरुद्देश प्रगति करावी, यांत नवीन वा अनपेक्षित असें कांहींच नाहीं.

विज्ञानाच्या – वस्तुशास्त्राच्या - क्षेत्रांत एक महत्त्वाची घटना म्हणजे, आपला विषय निव्वळ तात्पुरताच नव्हे तात्त्विक – म्हणजे दार्शनिक – महत्त्वाचा आहे, असें खगोल-शास्त्रज्ञांना वाटूं लागलें आहे. अर्थात् असें पूर्वींहि वाटत होते, पण ही भावना आतां वाढीस लागली आहे. अवकाश-संशोधनामुळें खगोलशास्त्राला एक प्रेरणाच मिळाली आहे.

तरीसुद्धां पूर्वापार चालत आलेल्या निरीक्षणाच्या तंत्रानेंहि विश्वाविषयींचीं कित्येक कोडीं उलगडतां येणें अद्यापहि शक्य आहे, याची जाणीव करून देणाऱ्या कित्येक असंबद्ध घटना १९६० सालांत घडल्या. कॅलिफोर्निया इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलजी येथें बाल्डविन ह्या शास्त्रज्ञानें केलेल्या एका निरीक्षणाचें सूत्र पकडून माउंट विल्सन आणि पॅलोमर येथील ऑब्झर्वेटरींत रुडोल्फ मिकोव्स्की या शास्त्रज्ञानें प्रकाशाच्या पेक्षां अडीच पट कमी वेगानें पृथ्वीच्या नक्षत्रमालिकें-







पासून दूर जाणाऱ्या एका नक्षत्रमालिकेचा शोध लावला आहे. दुर्बिणींत अतिशय क्षीण दिसणारी ही मालिका म्हणजेच उत्सर्जनाचें एक प्रमुख केंद्र आहे. तें तसें कां असावें, हें मात्र अजून एक गूढच आहे. आतांपर्यंतच्या सर्व सिद्धांतांनुसार, ही मालिका इतर मालिकांपेक्षां अधिक वेगानें पृथ्वीपासून दूर जात असल्यानें ती इतर मालिकांपेक्षां पृथ्वीपासून अधिक दूर आहे. पृथ्वीपासून जास्तींतजास्त दूर असणाऱ्या विश्वाचें निरीक्षण पूर्वीच्यां पद्धतींनुसारच करतां येईल, व त्यामुळें Cosmology तील भिन्न-भिन्न सिद्धांतांतील फरकावर प्रकाश पडेल, अशी उमेद शास्त्रज्ञ बाळगून आहेत.

वेगवेगळया सिद्धांतांतील एका मोठ्या फरकाची अशीच कसोटी गेल्या वर्षी घेतली गेली. हें विश्व पूर्वी लहान होतें, प्रदेश अधिक जवळ जवळ होते आणि तेव्हां पासून तें सारखें पसरत चाललें आहे, त्याची व्याप्ति वाढत चालली आहे, असा एक विश्वाच्या उत्पत्ती संबंधींचा सिद्धांत आहे. ह्या दृश्य व्याप्तीमुळें व आकाशांत सतत नवीन जडवस्तु निर्माण होत असल्यामुळें विश्व दिवसेंदिवस विरळ होत चाललेलें नाहीं, असा एक पर्यायी सिद्धांत आहे. आतां केंब्रिज येथें Mullard Radio Astronomy observatory मध्यें आकाशांतील उत्सर्जन-केंद्रांच्या स्थितीबाबत करण्यांत आलेल्या संशोधनानें पहिल्या सिद्धांतालाच उचलून धरलें आहे. वाढत्या संशोधनानें येत्या कांहीं वर्षांतच विश्वाच्या उत्पत्ती विषयीं व स्वरूपा विषयीं मांडण्यांत आलेल्या ह्या दोन सिद्धांतांतील फरक मिटवले जाण्याची शक्यता आहे.

तारे कशाचे बनलेले असतात व ते कसे बनतात, याविषयींहि तपशीलांत बरेंच संशोधन गेल्या वर्षी घडून आलें आहे: आकारहीन ढग, सूर्यासारखी परिस्थिति, मग तांबडे प्रकाशमान् तारे ( Betel geuse हा त्यांचा प्रतिनिधि ), नंतर शेवटीं white Dwarfs ह्यामुळेंच काळ मोजण्याचीहि एक नवीन पद्धति हातीं लागली आहे. आपली सूर्यमालिका ज्या ग्रहमंडळाचा एक घटक आहे, तें ग्रहमंडळ एक खर्व वर्षांपेक्षांहि अधिक जुनें आहे, असें आतां म्हणतां येतें. आणि आपल्या ग्रहमंडळांतील तारे व दुसऱ्या ग्रहमंडळांतील तारे, यांतील फरकहि याच पद्धतीनें लौकरच स्पष्ट करतां येऊं शकेल.

इन्फ्रा-रेड किरण उत्सर्जित करणारे तारे शोधून काढण्याकरितां यंत्रसामग्रि उपग्रहांतून अवकाशांत पाठविण्याची पद्धतहि गेल्या वर्षी अंमलांत आली. सूर्य व इतर ग्रहांपासून सुटणाऱ्या अतिशय प्रचंड शक्ति असलेल्या विद्युत् चुंबकीय उत्सर्जनामुळें ग्रहांच्या गर्भांत उष्णता पुरवणाऱ्यां कोणकोणत्या आणविक प्रतिक्रिया घडून येतांत, याचेंहि ज्ञान अवकाशांत सोडलेल्या उपग्रहांच्या साहाय्यानें होऊं शकेल. ग्रहां-ग्रहांमध्यें किती अंतर आहे व गेल्या दहा वर्षांत तें किती असेल, याबद्दलचीहि तपशीलवार माहिती उपग्रहांच्या उड्डाणामुळें हस्तगत होण्याची जबरदस्त शक्यता आहे.

खगोलशास्त्राकडून अणुशास्त्राकडे वळल्यास, तेथेंहि अशी उत्साही परिस्थिति आढळून येईल. " Neutrino physics " ह्या विज्ञानाच्या शाखेनें बरीच मजल मारली आहे. कांहीं विशिष्ट प्रकारच्या उत्सर्जनशील आणविक केंद्रबिंदूंच्या सडण्यामुळें Neutrino हा अणुकण अस्तित्वांत आहे असा निष्कर्ष निघाला ह्या अणुकणांत विद्युत्-भार नसतो आणि त्यांना वजन नसतें, त्यामुळें इतर अणुकणांबरोबर त्यांचा कांहींच सक्रिय संबंध येत नाहीं व त्यामुळें त्यांचा शोध घेणें अतिशय अवघड होऊन बसतें. विशिष्ट प्रकारच्या आणविक प्रतिक्रियांपूर्वी व नंतर 'parity' म्हणून ओळखला जाणारा गुणधर्म नेहमीं एकच राहत नाहीं, असा शोध चार वर्षांपूर्वी लागला, आणि Neutrino physics ची मुहूर्तमेढ झाली. त्यामुळेंच neutrino ह्या नांवानें संबोधले जाणारे अणुकण ( व त्यांच्याहि बाह्यतः मिळतेजुळते antineutrino हें अणुकण ) मुळांतच डावखुरे तरी असतात किंवा 'उजवे' तरी असतात. म्हणजेच निसर्गतः जगांतील घटकांत कांहीं विशिष्ट प्रकारचीं विसादृश्यें असतात—असें गृहित धरणें क्रमप्राप्त झालें. Neutrino हे कण इतर अणुकणांवर करणारी प्रक्रिया ही क्रियाशील Neutrino च्या बाबतींत प्रमाणाबाहेर अधिक जोरदार असेल, या तात्त्विक मुद्दयावर वाद आणि प्रयोग दोन्ही चालू आहेत.

जीवशास्त्राच्या क्षेत्रांत Motecular biology चें महत्त्व गेल्या सत्रंध वर्षांत वाढतच गेलें. जिवंत ऊती-मध्यें प्रथीन-द्रव्यें कशीं तयार होत असावींत, या बाबतचे प्रयोगहि झपाट्यानें पुरःसर झाले. जननशास्त्र अधिकाधिक गुंतागुंतीचें होत आहे. Chromosomes मधील ' अ-सामान्यत्व ' लैंगिक रोग यांतील संबंध पूर्वीपेक्षां अधिक स्पष्ट झाले आहेत. कॅन्सरविषयक संशोधनांतहि खूपच आशादायक परिस्थिति आहे.

रॉकेटमध्यें वापर करणांत येणाऱ्या जळणाविषयीं नवे मार्ग चोखाळल्यामुळें तंत्रशास्त्रहि अग्रसर होत आहे. उपग्रहांच्या अंतराळ – उड्डाणामुळेंच संदेश-वाहनाच्या क्षेत्रांतहि ' maser ' ह्या उपकरणामुळें रेडिओची संवेदनक्षमता वाढविण्याचें एक साधन हातीं लागलें आहे. त्याचप्रमाणें Optical masers मुळें रेडिओलहरींपेक्षां सुलभपणें प्रकाशलहरीच संदेश कसें पोंचवूं शकतील, याचें संशोधनहि गेल्याच वर्षी झालें आहे.

एकूण गेल्या वर्षी अनेक नवीं सूत्रें हातीं आलीं आहेत, त्या सूत्रांवरून काय निष्पन्न होतें, तें आतां ह्या वर्षी कळेल.

---










प्रा. न. र. फाटक

# प. कृ. गोडे

पुणें येथील भांडारकर प्राच्यविद्या संशोधनाच्या ग्रंथसंग्रहालयाचें व्यवस्थापक डॉ. प. कृ. गोडे हे ता. २८ मे १९६१ रोजीं वयाच्या ७१ व्या वर्षी एकाएकीं हृदयक्रिया थांबून दिवंगत झाल्यामुळें भारतीय संस्कृतीच्या संशोधनाची जी हानि घडली ती खऱ्या अर्थानें लवकर भरून निघण्यासारखी नाहीं. गेल्या दोन वर्षांत महाराष्ट्रांतील ध्येयनिष्ठ व्यासंगी विद्वानांवर काळाची वक्रदृष्टि असल्या प्रमाणें इतिहासाच्या कार्यक्षेत्रांतील चांगल्या कार्यकर्त्यांना महाराष्ट्र अंतरलें आहे. अ. स. आळतेकर, गो. स. सरदेसाई, चिं. ग. कर्वे आणि त्यामागून डॉ. गोडे अशी ही संशोधक लेखकांच्या मृत्यूची परंपरा आहे. त्यामध्यें डॉ. गोडे यांच्या संशोधनाची दिशा कांहींशी अनन्यसाधारण असल्यानें त्यांच्या कार्यक्षेत्रांत नवा संशोधक दिसायला किती काळ लोटेल हें सांगणें फार कठिण आहे. आळतेकरांनीं लिहिलेल्या ग्रंथांच्या विषयावर अनेकांचा हात फिरलेला आहे. तर देसायांनीं मराठेशाहीचा विषय जन्मभर चोखाळला असला तरी त्या विषयाचे ज्ञाते महाराष्ट्रांत सांपडतील. कर्व्यांचे लेखन प्राधान्यानें मराठ्यांच्या इतिहासाशींच संलग्न होते. डॉ. गोडे यांनीं भारतीयांच्या आहार-विहाराचें एकेक अंग डोळ्यापुढें ठेवून त्याच्या मुळापर्यंत जाऊन तें अंग भारतीय संस्कृतीमध्यें कोणत्या काळीं स्थिरावलें व त्याचें उगमस्थान कोणतें, असे प्रश्न सोडविण्याचें काम मागील पन्नास वर्षें अखंड चालविलें होतें. इतिहासकाळांतील उपलब्ध वाङ्मयाच्या आधारें भारतीयांचा आहार-विहार कसा होता याचें दिग्दर्शन करणारे ग्रंथ आजवर पुष्कळ झाले. परंतु डॉ. गोडे यांचा प्रकार निराळा होता. ह्याचीं उदाहरणें पाहिल्यावर त्याचें स्वरूप लक्षांत येईल.

डॉ. गोडे भां. प्रा. वि. संशोधन संस्थेची हस्तलिखितें अभ्यासीत असतां त्यामध्यें एखाद्या वस्तूचें नांव प्रथमच दृष्टीस पडल्याप्रमाणें वाटल्यास ते त्या वस्तूच्या इतिहासाचा पिच्छा पुरवीत असत. त्यांनीं नथ या नाकाच्या अलंकारावर लिहिलेल्या लेखाचा निर्देश गोडयांच्या मृत्युलेखांतून कित्येकांनीं पूर्वी केलेला आहे. हा दागिना प्राचीन भारतीयांना परिचित नव्हता, असें गोडयांनीं आपल्या लेखांत दाखवून दिलें आहे. एकदां सोळाव्या शतकांतील जैनानें लिहिलेल्या वैद्यकीच्या ग्रंथांत औषधामध्यें गुलाबकळीचा उल्लेख पाहातांच गोडयांचें लक्ष गुलाबाकडे वळलें. हल्लीं गुलाब हें फूल इतकें ओळखीचें आहे कीं तें अनादिकाळापासून लोकांना माहीत असलें पाहिजे असें वाटतें. परंतु इतिहासकाळीं तें लोकांच्या परिचयांत येऊं लागलें व हळूहळू त्याचा प्रसार देशभर झाला अशा निर्णयाचा गोड्यांचा या संबंधाचा प्रबंध आहे. अत्तर गुलाब हें सन्मानाकरितां वापरले जाणारे विलासाचे पदार्थ मोगलांच्या कारकिर्दीमध्यें लोकव्यवहारांत आले; असा गोड्यांच्या याविषयींच्या प्रबंधाचा निष्कर्ष आहे. सांप्रत लग्नाच्या वरातीमध्यें जी आतषबाजी ( भुईनळे, चिचुंद्या, चंद्रज्योति वगैरे पदार्थांचा उपयोग ) चालते तिच्यावर गोड्यांचा एक लेख आहे. मराठी वाङ्मयांत एकनाथांनीं राम व कृष्ण यांचे विवाह वर्णितांना आतषबाजीला स्थान दिलेलें आहे. रामदासांनीं अग्नीच्या विवेचनांत आतषबाजीच्या संदर्भांत तोफांची वरणी लावली आहे. गोड्यांना पंधराव्या शतकाच्या शेवटीं लिहिलेली एक पोथी वाचायला मिळाली. तिच्यांत आतषबाजीच्या निरनिराळ्या जिनसा कशा तयार कराव्या, त्या जिनसांतून वेगवेगळे रंग दिसण्याकरितां कोणतीं द्रव्यें वापरावी, याची माहिती आहे. भारतामध्यें आतषबाजीचा उदय मुसलमानांच्या आमदानींत झाला, हें सिद्ध करून समाधान मानणारी गोड्यांची जिज्ञासा नव्हती. त्यांनीं उडणाऱ्या दारूबद्दल ज्यांनीं पूर्वी संशोधन केलें होतें, त्या सर्वांशीं पत्रव्यवहार चालवून कालाच्या दृष्टीनें जितकें मागें जाणें शक्य होतें तितकें मागें जाऊन मग आपलें संशोधन थांबविलें व आपला निबंध पुरा केला. आपल्या संशोधनांत कसलीहि उणीव राहूं न देण्याच्या प्रवृत्तीनें गोड्यांनीं जगांतील किती संशोधकांशीं स्नेह जोडला, याची गणती करणें कठिण आहे. जगांतील संशोधनाचा व संशोधकांच्या ज्ञानाचा लाभ गोडे घेत असत, परंतु हा लाभ एकतर्फी नव्हता. गोड्यांच्या ज्ञानाचा लाभ जगांतील संशोधक घेत होते. यामुळें त्यांचा पत्रव्यव-








हाराचा पसारा अफाट होता. एखाद्या गोष्टीचें संशोधन केलें असें त्यांच्या मनानें घेतलें कीं त्या संशोधनाचा झटपट निकाल व्हावा अशी त्यांना घाई नसे. त्यांच्या अनेक प्रबंधांतील माहिती जमायला कित्येक वर्षें लोटल्याचीं उदाहरणें सांगतां येतील. एका वेळीं त्यांचें अनेक विषयांचे संशोधन चाले. त्यासाठीं त्यांनीं आपल्या टेबलाला वेगवेगळीं पुडें केलेलीं होतीं. ज्यांचे संशोधन त्या विषयाकरितां राखून ठेवलेल्या पुडांत नवी माहिती हातीं आली कीं, तिची टांचणें टाकायची; चार सहा महिन्यांनीं त्या विषयाची संशोधनाची मजल कोठपर्यंत आली आहे, याचा तीं टांचणें एकत्र लावून आढावा घ्यावयाचा अशी त्यांची पद्धति असे. अशा रीतीनें त्यांनीं लिहिलेल्या संशोधनपर निबंधांची संख्या पांचशेच्या घरांत सहज जाते. त्या निबंधांतून अगदीं साध्या आणि नेहमीच्या व्यवहारांतील गोष्टींचा गोडयांनीं केलेला उलगडा पाहिला म्हणजे तो पहाणारांच्या गळीं आपल्या ज्ञानाचा कोतेपणा उतरण्याला उशीर लागत नाहीं. जिलबी हें पक्वान्न माहीत नाहीं किंवा आवडत नाहीं, अशीं माणसें विरळाच सांपडतील, पण हें पक्वान्न मुळांत भारतीय नाहीं, तें अरबांचें आहे याची कल्पना बहुधा पुष्कळांना नसणें संभवते. गोड्यांनीं याप्रमाणें खाद्यें पेयें, वस्त्रालंकार, विलासाचे पदार्थ यांचा इतिहास सांगून एकप्रकारें भारतीय संस्कृतीच्या विकासाच्या सर्वांगीण परीक्षणाची सोय केली आहे. त्यांचें हें कार्य अपूर्व आहे. गेलीं शंभर दीडशें वर्षें अनेक देशी विदेशी संशोधक भारताच्या इतिहासावर प्रकाश टाकण्याचा यत्न करीत आहेत, परंतु त्यांपैकीं एकानेंहि गोडयांच्या संशोधनाची दिशा स्वीकारलेली दिसत नाहीं, म्हणूनच आरंभीं गोडयांच्या कामगिरीचे अद्वितीयत्व सुचविलें आहे व तें अतिशयोक्तीचें नाहीं. असा विश्वास वाटतो.

डॉ. गोड्यांनीं आपलें काम कसें पार पाडलें, याचा विचार करूं लागले तर त्यांतहि विलक्षणपणा दृष्टीस पडेल. आपल्या कामाची जागा व घर यांना चिकटून त्यांनीं सारें आयुष्य घालविलें. याचा अर्थ ते जगाशी फटकून वागत होते असा समजूं नये. परंतु निष्कारण कालव्यय करावयाचा नाहीं, असा त्यांचा दंडक होता. पुण्यांतील सभासमारंभाचें अध्यक्षस्थान मंडित केल्याचें उदाहरण हवें असल्यास तें मुद्दाम शोधावें लागेल. अध्यक्षस्थान राहो, पण वक्ते या नात्यानेंहि ते सभांना उपस्थित राहिल्याचीं उदाहरणें सांपडणार नाहींत. आपल्यापाशीं एखाद्या विषयाचें ज्ञान सिद्ध असून त्याची वाच्यता ज्यांमध्यें करावयाची तें विद्योपासनेचें स्थान आहे, असें वाटल्यास ते एखाद्या वर्षीं पुण्याच्या एखाद्या सभेंत व्याख्यान देत असत. कामाच्या जागीं किंवा घरीं ते स्नेह्यासोबत्यांशीं पुष्कळ बोलत; त्यांना बोलण्याचा कंटाळा नव्हता, पण सभा गाजविण्याचा कंटाळा होता. प्रवासाचीहि त्यांना रुचि नव्हती. पुणें सोडून ते बाहेरगांवीं गेल्याचे प्रसंग अगदीं तुरळक सांपडतील.

डॉ. गोडयांचें बालपण सुस्थितीचें नव्हतें. यामुळें विद्यार्जन त्यांनीं बुद्धिमत्तेच्या जोरावर पण कांहींसें कष्टानेंच पार पाडलें. त्यांच्या बुद्धीची चमक व कर्तृत्वाची उमेद ओळखून कै. प्रा. पां. दा. गुणे यांनीं गोडयांना भांडारकर प्रा. सं. संस्थेशीं जोडलें. गुण्यांसंबंधाची कृतज्ञता गोडे पुष्कळदां व्यक्त करीत असत. भांडारकरांच्या या स्मारकसंस्थेशीं कार्यकर्तेपणानें ज्यांचा संबंध आला, त्यांत गोडयांची जागा फार उंचीची आहे. त्यांच्या संशोधनकार्यानें जगांतील विद्वानांना प्रस्तुत भांडारकरसंस्थेचा जेवढा परिचय करून दिला असेल तेवढा या संस्थेमार्फत प्रसिद्ध होणाऱ्या महाभारताच्या चिकित्सक आवृत्तीनें सुद्धां करून दिला नसेल. त्या संस्थेंत पुण्यांतील पुष्कळ नवे जुने विद्वान् वावरतात, पण कामाच्या बाजूनें त्यांपैकीं एकालाहि गोड्यांच्या जोडीस बसवितां येणार नाहीं. भांडारकरसंस्थेच्या सुरुवातीपासून गोडयांचा त्या संस्थेशी संबंध असल्यामुळें तेथील हयात व मयत काम करणारांच्या वर्तनाच्या भल्याबुऱ्या हकीकतींचा जो सांठा गोडयांपाशीं होता, त्याची ओळख असणारांना वरील तुलनात्मक विधान मुळींच गैर वाटणार नाहीं. गोडे स्वतःपुरते निरपेक्ष वृत्तीचे होते पण इतरांना मदत करण्याला ते सदैव तत्पर असत. त्यांच्या निबंधाचे संग्रहग्रंथ हल्लीं छापले जात आहेत. गोडे गेले तरी हे ग्रंथ त्यांच्या विद्याव्यासंगाची साक्ष चिरकाल देत राहातील.

---

डॉ. प. कृ. गोडे अनुवादक : श्री. वि. म. वेडेकर

# प्राचीन भारतीय गंधशास्त्र : सुगंधी तेलें, उटणीं, अत्तरें

## – ऐतिहासिक समालोचन

[ भांडारकर प्राच्यविद्यासंशोधनमन्दिर या संस्थेचे सतत गेलीं ४२ वर्षे असलेले क्युरेटर आणि आंतरराष्ट्रीय कीर्तीचे प्राच्यविद्यासंशोधक डॉ. परशुराम कृष्ण गोडे हे गेल्या २८ मे १९६१ रोजीं पुणें येथें एकाएकीं निधन पावले. ११ जुलै हा त्यांचा वाढदिवस; येत्या ११ जुलै १९६१ ला त्यांच्या वयाला सत्तर वर्षे पूर्ण होणार होतीं : त्यांच्या वाढदिवसाच्या निमित्तानें, अभिनंदनाच्या भावनेनें, गेल्या वर्षाप्रमाणेंच यंदाहि त्यांच्या संशोधनपर लेखांचा परिचय नवभारताच्या वाचकांस करून देण्याचें आम्हीं योजिलें. गेल्या वर्षी 'ताम्बूल' या विषयावरील त्यांच्या लेखांचा सारांशरूप सुसूत्र अनुवाद आम्ही सादर केला यंदां तसाच दुसऱ्या मनोरंजक विषयावरील – 'सुगंधी द्रव्यें' यावरील त्यांच्या लेखांचा सारांशरूप अनुवाद देत आहोंत. या आमच्या उपक्रमास त्यांची पूर्ण संमति होती व त्यांनीं Cosmetics and Perfumery या विषयावरील आपलें लेखसाहित्यहि त्याकरितां दिलें होतें. या विषयावरील त्यांचे लेख सुमारें १०० पानें असून, प्रस्तुत लेख त्यांचा संक्षिप्त सारांश आहे. – हा अनुवादरूप लेख सादर करतांना, वाढदिवसाच्या अभिनंदन भावनेऐवजीं त्यांच्या निधनाबद्दलची शोकभावना व्यक्त करावी लागत आहे हें दुर्दैव होय. डॉ. गोडे यांच्या स्मृतीस आम्ही सादर श्रद्धांजलि अर्पण करतोः – का. सं. ]

प्राचीन भारतीय लोक जसे धर्म व अध्यात्म यांचे उपासक होते तसेच ते ऐहिक सुंदर सुंदर भोग्यवस्तूंचे मोठे रसिक व चोखंदळ भोक्ते होते याची साक्ष त्यांचा आहार, विहार, वेषभूषा याविषयीं जीं वर्णनें संस्कृत वाङ्मयांतून आढळून येतात त्यांवरून कोणालाहि पटण्यासारखी आहे. मागें आम्हीं 'नवभारतांतून तांबूलाचा इतिहास या दृष्टीनें सुसूत्र मांडून दाखविला होता. प्रस्तुत लेखांत प्राचीन भारतीयांच्या सुगंधप्रेमाविषयीं व त्या आवडीमुळें त्यांनीं भारतीय गंधशास्त्राचा जो पाया घातला त्याच्या विषयीं थोडक्यांत ऐतिहासिक समालोचन करावयाचें योजिलें आहे.

गंधशास्त्राचें स्वरूप व प्रयोजन काय याविषयीं एका श्लोकांत जें वर्णन आलें आहे त्यावरून भारतीयांची या शास्त्राकडे पहाण्याची दृष्टि दिसून येते. त्या श्लोकांत म्हटलें आहे :

"देवांची शुभगंध धूपांनीं जी पूजा-अर्चा करावी लागते त्या पूजेस पूर्णता आणणारें, लोकांना आनंदायक, धर्म-अर्थ-काम या त्रिवर्गाच्या फळाची प्राप्ति करून देणारें, असुंदरता नाहींशी करणारें, राजांना संतोषकारक, निपुण व रसिक अशा प्रमदांच्या चित्तांना प्रमुदित करणारें असें हें शुभगन्धशास्त्र आहे¹..."

लोकांच्या सुगंधप्रेमाचा फायदा घेऊन सौगंधिक वस्तूंचे व्यापारी कसे जबर नफा घेत असतात याविषयीं एक संस्कृत सुभाषित सुप्रसिद्ध आहे :

'पण्यानां गांधिकं पण्यं किमन्यैः कांचनादिभिः ।
तत्रैकेन च यत्क्रीतं तत् शतेन प्रदीयते ॥'

— गंगाधरकृत 'गंधसारां'तून

१ "देवानां शुभगन्धधूपसहितस्यार्चाविधेरर्पकं
नृणां पुष्टिकरं त्रिवर्गफलदं स्वस्याप्यलक्ष्मीहरम् ।
राज्ञां तोषकरं विदग्धवनिताचित्तप्रमोदप्रदं
शास्त्रं सच्छुभगन्धशासनमतो दिङ्मात्रमत्रोच्यते ॥"

( सगळ्या व्यापारांत उत्तम व्यापार सुवासिक वस्तूंचा, त्याच्यापुढें सोन्यामाणक्यांची काय कथा ? या सुवासिक वस्तूंच्या व्यापारांत एक पटीनें विकत घ्यावें आणि खुशाल शंभर पट किंमत घेऊन विकावें.)

या सुभाषितांत गांधिकांच्या नफ्याचें केलेलें वर्णन थोडें अतिशयोक्तिपूर्ण असलें तरी त्यांत बरेंच तथ्य आहे. मला माझ्या लहानपणची गोष्ट आठवते. खेडेगांवांतून घरोघर हे गंधी आपली सुगंधी तेलें व अत्तरें घेऊन विकत असत. त्यांच्या बरोबरच्या पेटींत सुगंधी अत्तराच्या कुप्यांबरोबर आणखी लहान लहान कुप्याहि असत. या कुप्यांतून साधें तिळाचें तेल भरलेलें असे. सुगंधी अत्तराची बाटली तयार करावयाची म्हणजे टोंकाला थोडा कापूस गुंडाळलेवर काडीचें टोक अत्तरांत बुडविल्यासारखें करून ते झटकन तिळाच्या तेलाच्या बाटलींत बुडवून थोडें ढवळायचें कीं झालें अत्तर तयार. ती अगदीं लहान बाटली एक रुपयाला विकत असत. मस्त सुगंध येतो म्हणून घेणारा गिराईक त्या वेळेपुरता खूष असे. अत्तरवाल्या गंध्याची पाठ फिरली कीं कांहीं दिवसांनीं सुगंधी वास उडून जात असे. अशा रीतीनें सुगंधी द्रव्यांचा व्यापारी पहातां पहातां वाटेल तेवढा नफा उपटून जात असे !

सुगंधी वस्तूंच्या व्यापाऱ्यांना अलोट फायदा मिळतो हा लोकांमध्यें समज जुन्या काळापासून दृढ आहे. ' रसरत्नाकर ' नांवाच्या १३ व्या शतकांतील ग्रंथांत तर हिरेमाणकें व सुगंधी वस्तू तयार करून विकणें हे अलोट संपत्ति मिळविण्याचे मार्ग होत असें म्हटलें आहे.

निसर्गांतील सुगंधी वस्तूंनी आकृष्ट होऊन प्राचीन भारतीयांनीं नैसर्गिक सौगंधिक वस्तूंचा व तदुद्भव अनेक संमिश्र सुगंधांचा उपभोग घेतला आहे, असें अनेक जुन्या ग्रंथांतील वर्णनावरून दिसतें. अष्ट भोगांमध्यें सुगंधभोग एक असून त्याचें एक शास्त्र- ' गंधशास्त्र ' किंवा कला ' गंधयुक्ति ' तिचा पाया भारतीयांनीं प्राचीन काळीं घातलेला दिसून येतो. गंधशास्त्राच्या किंवा गंधयुक्तीच्या विचारास प्राचीन काळीं प्रारंभ झाला होता असें ज्या ग्रंथांच्या आधारें म्हणतां येतें त्यांचा थोडक्यांत परिचय करून देणें उचित होईल.

### प्राचीन गंधशास्त्राचे कांहीं आधारभूत ग्रंथ

सुप्रसिद्ध आयुर्वेदीय ग्रंथ ' चरकसंहिता ' यांत औषधी तैलें वातरक्तासारख्या आजारांवर उपचार म्हणून उपयोगी पडतात असें म्हटलें आहे. उदा० अमृताद्यतैल, सुकुमारकतैल, महापद्मकतैल इत्यादि. हीं तेलें तयार करतांना त्यांत घटक द्रव्यें म्हणून चंदन, उशीर, केशर, तगर, मंजिष्ठा, कुंकुम, पत्रैला, अगुरु यांसारखीं सौगंधिक द्रव्येंहि वापरलेलीं आढळून येतात. हीं सुगंधद्रव्यमिश्रित औषधी तैलें तयार करतां करतां, सुगंधी तेलें तयार करण्याचें शास्त्र व कला प्रगत झाली असावी असें अनुमान करावयास हरकत नाहीं. वात्स्यायनाच्या ' कामसूत्रां 'त तर नागरिकाला ज्या चौसष्ट कला अवगत असाव्यात असें म्हटलें आहे त्यां कालांत ' गन्धयुक्ति ' ( सुवासिक तेलें, उटणीं तयार करण्याची कला ) या कलेचाहि अन्तर्भाव आहे.

अशा प्रकारें प्राचीन भारतीयांनीं गंधशास्त्राचा व गंधयुक्तीचा विचार केलेला दिसून येत असला, तरी त्यावर पद्धतशीर असा स्वतंत्र ग्रंथ प्राचीन काळचा निश्चित असा आज तरी उपलब्ध नाहीं. गंधशास्त्रावर स्वतंत्र ग्रंथ १२ व्या वा १३ व्या शतकानंतरचेच आणि तेहि दोनच उपलब्ध आहेत. १३ व्या शतकापूर्वीच्या काळांत गंधशास्त्रासंबंधीं जें कांहीं उपलब्ध आहे तें कांहीं जुन्या ग्रंथांतील त्रोटक प्रकरणांच्या व टिपणांच्या रूपानेंच उपलब्ध आहे. अशा जुन्या ग्रंथांत वराहमिहिराची ( इ. स. ५०० ) ' बृहत्संहिता ' हा ग्रंथ असून त्यांत ' गंधयुक्ति ' नांवाचें प्रकरण आहे. त्याचा उल्लेख पुढें लेखांत केलेला आढळून येईल.

कालानुक्रमानें त्यानंतरचा ग्रंथ म्हणजे ' अग्निपुराण ' ( इ. स. ९ वें शतक ) यांत अध्याय २२४ मध्यें ' स्त्रीरक्षादिकामशास्त्र'प्रकरणीं गंधयुक्तीबद्दल कांहीं थोडें वर्णन आलें आहे. त्यांत सुगंधी वस्तू तयार करतांना पांच प्रकारचीं कर्में किंवा प्रक्रिया आवश्यक होत असें म्हटलें आहे. त्या प्रक्रिया म्हणजे

---

२ ' सुगंधवनितावस्त्रं गीतताम्बूलभोजनम् । शय्या च कुसुमं चैव भोगाष्टकमुदाहृतम् ॥ ' हा श्लोक गागाभट्टांनीं ( इ. स. १६२०–१६८५ ) आपल्या ' कायस्थधर्मप्रदीपांत उद्धृत केला आहे.








१ शौच किंवा शोधन, २ आचमन, ३ विरेचन, ४ भावन, ५ पाक, ६ बोधन, ७ धूपन, ८ वासन ह्या होत. ज्या द्रव्यांनीं ' धूपन ' करायचें अशीं २१ द्रव्यें सांगितलीं आहेत. स्नानाला योग्य अशीं तगर, कर्पूर, कस्तूरी इत्यादि सुगंधी द्रव्यें, तोंडाला चांगला सुवास यावा म्हणून वेलदोडे, लवंग, कंकोल, जायफळ इत्यादि द्रव्यांचें मुखवासक चूर्ण व गुटिका, फुलांचा भरपूर वांस दिलेल्या तिळांपासून गाळलेलें ' गन्धतैल ' ( ' तैलं निपीडितं राम तिलैः पुष्पाधिवासितैः । ' ) — इत्यादि सौगंधिक वस्तूंचा निर्देश अग्निपुराणांतून आढळून येतो. अशाच प्रकारचा सौगंधिक पदार्थांचा निर्देश विष्णुधर्मोत्तर पुराण, यांतील " गंधयुक्ति " प्रकरणांत ( खंड २. अध्याय ६४ ) आढळून येतो. आणखी एका म्हणजे ' कालिकापुराणांत' ( अध्याय ७३ ) देवपूजा करतांना किती प्रकारचे सुगंध वापरावेत याचें वर्णन केलें आहे. देवपूजेकरितां जीं सुगंधी द्रव्यें वापरावयाचीं त्यांचे पांच प्रकार दिले आहेत. १ चूर्ण केलेलीं द्रव्यें, २ घांसलेलीं किंवा उगाळलेली, ३ जाळांतून उद्भवणारीं किंवा पसरणारीं, ४ चुरडून तयार केलेलीं, ५ प्राण्याच्या अंगांतून उत्पन्न झालेलीं.³

कालक्रमदृष्ट्या साधारण यानंतरचा ग्रंथ म्हणजे सोमेश्वर राजाचा ( इ. स. ११३० ) मानसोल्लास ग्रंथ होय. त्यांत गंधभोग प्रकरण नांवाचें प्रकरण आहे. यांतीलहि उल्लेख पुढें लेखांत आलेच आहेत.

नित्यनाथ सिद्ध ( इ. स. १३ वें शतक ) यानें रचलेल्या ' रसरत्नाकर ' नामक ग्रंथांत ' गंधवाद ' नांवाचें एक प्रकरण असून त्यांत सौगंधिक वस्तू तयार करण्याच्या अनेक प्रक्रिया वर्णिलेल्या आहेत. या प्रकरणाच्या आरंभींच्या श्लोकांत ' गंधवादा'च्या किंवा गंधशास्त्राच्या अभ्यासाची आवश्यकता काय हें सांगितलें आहे. नित्यनाथ सिद्धि या श्लोकांत सांगतातः ⁴ "संसारांत सारभूत व सकलांना सुख देणारी अशी जर कोणती गोष्ट असेल तर ती म्हणजे विपुल धन होय. तें साध्य कसें करायचें हें साधक श्रेष्ठांनीं गुरुमुखांतूनच समजून घ्यावें. प्रस्तुत स्थळीं कांहीं सांगणार आहोंत. रत्नें तयार करावयाची कला त्याचप्रमाणें शुभकारक असें समग्र गंधशास्त्र यांचें ज्ञान करून घेतल्यास अशा ज्ञात्या पंडितांना धनसिद्धि होते हें प्रत्यक्ष अनुभवाला येईल व त्यांना पावन करील." नित्यनाथ सिद्धाचे वरील उद्गार लौकिकदृष्ट्या सदासर्वकाळ सार्थच राहतील यांत शंका नाहीं. रत्नें आणि सुवासिक द्रव्यें यांच्या योगानें किती विपुल संपत्ति मिळते हें आपण प्रत्यक्ष व्यवहारांत पहातोंच. एका रुपयास जें खरेदी करावयाचें तें शंभर रुपयास विकायचें असा शंभर पट फायदा हे गांधिक म्हणजे सुवासिक द्रव्यांचे व्यापारी काढतात अशा अर्थाचें सुभाषित आपण वर पाहिलेंच आहे - प्रस्तुत ' रसरत्नाकर ' ग्रंथांत पद्मराग, इन्द्रनील, मरकत, पुष्पराग, मुक्ताफल, प्रवाल इत्यादि रत्नें कशीं तयार करावयाची याबद्दलच्या प्रक्रिया सांगितल्या आहेत. त्याचप्रमाणें चन्दन, कर्पूर, कस्तूरी, कुंकू, दिव्यधूप, फुलांचे रस इत्यादि सौगंधिक वस्तूहि कशा करावयाच्या त्याच्याहि प्रक्रिया दिल्या आहेत. प्राचीन कालीं ' रसविद्ये 'चे प्रवर्तक ज्यांना अद्भुत सिद्धी प्राप्त झाल्या होत्या असे सिद्ध योगी होते, असें मानतात. ही सिद्धांची रसविद्या केवळ कल्पनाजाल होतें असें मानण्याचें कारण नाहीं. हे सिद्ध सुवर्ण, रत्नें, सुगंधी वस्तू निर्माण करण्याचे प्रत्यक्ष प्रयोग करीत असावेत असें नित्यनाथ सिद्धाच्या वर्णनावरून वाटल्याशिवाय रहात नाहीं.

वर ज्या ग्रंथांचा उल्लेख आला आहे, ते केवळ गंधशास्त्रावरील नसून त्यांतील कांहीं प्रकरणेंच गंध-

---

३. चूर्णीकृतो वा घृष्टो वा दाहकर्षित एव वा ।
रसः सम्मर्दजो वापि प्राण्यङ्गोद्भव एव वा ॥
गन्धः पञ्चविधः प्रोक्तो देवानां प्रीतिदायकः ॥ ( ३७-३८ )

४. संसारे सारभूतं सकलसुखकरं सुप्रभूतं धनं वै
तत्साध्यं साधकेन्द्रैर्गुरुमुखविधिना वक्ष्यते तस्य सिद्ध्यै ।
रत्नादीनां विशेषात्करणमिह शुभं गन्धवादं समग्रं
ज्ञात्वा तत्तत्सुसिद्धं ह्यनुभवपथगं पावनं पण्डितानाम् ॥








शास्त्राच्या विवेचनाला दिलीं आहेत हें वर स्पष्ट केलेंच आहे. त्या ग्रंथांचें स्वरूपच त्या त्या काळचें निरनिराळ्या ज्ञात शाखांतील ज्ञान संगृहीत करणारें संग्रहात्मक असल्यामुळें, गंधशास्त्राला त्यांत कांहीं थोडीं प्रकरणेंच देतां आलीं. त्या प्रकरणांवरून मात्र गंधशास्त्राचा विचार प्राचीन भारतीयांनीं चांगला केला असावा व त्यावर कांहीं स्वतंत्र ग्रंथहि लिहिले असावे असा तर्क करतां येतों. पण अशा प्रकारचें प्राचीन ग्रंथ अजून उपलब्ध झालेले नाहींत.

सुदैवानें अलीकडच्या काळांतील ( म्हणजे सुमारें इ. स. १३००–१६०० ) आजपर्यंत अज्ञात असलेले दोन ग्रंथ-केवळ गंधशास्त्राचें निरूपण करणारे माझ्या दृष्टोत्पत्तीस आले. भांडारकर प्राच्यविद्यामंदिराच्या हस्तलिखित संग्रहांत ह्या दोन ग्रंथांचीं हस्तलिखितें आढळून आलीं. ह्या दोन ग्रंथांचा अभ्यास करून त्यांतील गंधशास्त्रविषयक माहितीचा परिचय मी इतरत्र नियतकालिकांतून करून दिलाच आहे. या दोन ग्रंथांनीं त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या गंधशास्त्रावरील ग्रंथांचा व प्रकरणांचा उपयोग केला असला पाहिजे असें साधार दाखवितां येतें.

हे दोन ग्रंथ म्हणजे ( १ ) गंगाधर नायक लेखकाचा 'गंधसार' नांवाचा आणि (२) दुसरा मराठी टीकेनें युक्त असलेला 'गंधवाद' नांवाचा. 'गंधवादा'च्या लेखकाचें नांव आढळत नाहीं.

गंधशास्त्राचें स्वरूप व प्रयोजन काय या संबंधीं आरंभीं दिलेला श्लोक या 'गंधसार' ग्रंथांतीलच आहे. ग्रंथकर्त्या गंगाधरानें आरंभीं चार देवतांना नमन केलें आहे. त्या चार देवतांपैकीं शिव, गणपति, सरस्वती या तीन असून चौथी देवता अपरिचित अशी 'गंधर्वयक्ष' किंवा 'गंधयक्ष' नांवाची आहे. गंगाधरानें ज्या अर्थीं या विशिष्ट देवतेला आवाहन केलें आहे त्या अर्थीं 'गंधयक्ष' ही देवता गंधशास्त्राची अधिष्ठात्री देवता मानलीं गेली असावी असा तर्क करतां येतो. सुंदर, मधुर सुवासानें दरवळणाऱ्या वातावरणांत हरखून गेलेल्या भाविकाच्या मनाला इहलोकापासून दूर अशा दिव्य यक्षभूमींत विहार करावासा वाटला व त्यानें 'गंधयक्षा'ला देवतेचें स्वरूप दिलें असतें तर त्यांत कांहीं आश्चर्य नाहीं. मात्र इतर ग्रंथांतून ही 'गंधयक्ष' देवता उल्लेखिलेली आढळून येत नाहीं.

गंगाधरानें सुगंधी द्रव्यांचें आठ वर्ग केले आहेत ते असे : १ पानें, २ फुलें, ३ फळें ( जायफळ, वेलदोडे ), ४ झाडाच्या साली ( कापराच्या किंवा लवंगाच्या वगैरे झाडांच्या सारख्या ), ५ लाकूड ( चंदन इत्यादि ), ६ मुळें, ७ वनस्पतींचा स्राव ( कापूर ), ८ प्राणिज पदार्थ ( कस्तूरी, मध, लाख ) इत्यादि. गंगाधरानें प्रस्तुत ग्रंथांत सुगंधी द्रव्यें तयार करण्याच्या सहा प्रक्रिया वर्णन केल्या आहेत. (१) भावन म्हणजे चूर्ण द्रवांत घालून तें चांगलें मुरवणें. (२) पाचन=भावनानें तयार झालेला द्रव पकवणें किंवा उकळणें. (३) बोध= एखाद्या सुगंधाच्या साहाय्यानें मिश्रणांतील सुवास अधिक जागृत करणें. (४) वेध=बोधाचीच पुढची पायरी. (५) धूपन=धूर देणें. (६) वासन=फुलांच्या सुवासाचा वास देणें.– वर 'अग्निपुराणां' त सुगंधी द्रव्यें तयार करण्याच्या आठ प्रक्रिया उल्लेखिल्या आहेत. त्यांचा गंगाधरानें सहा प्रक्रियांत संक्षेप व समावेश केलेला दिसतो.

दुसरा माझ्या आढळांत आलेला हस्तलिखित ग्रंथ म्हणजे 'गंधवाद' हा होय. त्यासोबत मराठी टीकाहि आहे हें वर सांगितलेंच आहे. या सटीक 'गंधवाद' ग्रंथांत 'सुगंधी बुक्का' याचा उल्लेख आला असून तो यादव राजा सिंहण यानें शोधून काढला असें म्हटलें आहे. हा यादव राजा सिंहण इ. स. १२१०–१२४७ मध्यें होऊन गेला. 'गंधवादा' वरील मराठी टीकेची भाषा बघतां ती जुन्या मराठी भाषेसारखी दिसते. तेव्हां सटीक 'गंधवाद' ग्रंथ इ. स. १५३० ते १५५० मध्यें रचला गेला असावा असें अनुमान, यापेक्षां दुसरा बळकत्तर पुरावा मिळेपर्यंत तरी करावयास हरकत नाहीं.– या 'गंधवाद' ग्रंथांत 'दारुचिनी' किंवा दालचिनीचा उल्लेख असून, सुगंधी द्रव्यें तयार करतांना काचकुप्या वापरीत असत व सुगंधी अर्क कांबळ्यांतून गाळून घेत असत ( "कांबलेनि गालुनि घेईजे" ) असेहि निर्देश सांपडतात.

भारतीयांच्या प्राचीन काळांतील गंधशास्त्र-विचाराला आधारभूत अशा कांहीं प्रमुख ग्रंथांचा वर परिचय करून दिला आहे. त्यांच्या जोडीला इतरहि

ऐतिहासिक साहित्याचें साहाय्य घेऊन प्रस्तुत लेखांत कांहीं सौगंधिक वस्तूंच्या – गुलाबपाणी व अत्तर, चंपक तैल व अंबर – यांच्या इतिहासाचें संक्षिप्त समालोचन करावयाचें योजिलें आहे. त्या आधीं राजाच्या स्नानविधीच्या निमित्तानें कांहीं सुगंधी उटणीं, उट्या व तेलें कशीं तयार करीत याचें वर्णन करणारें एक उद्बोधक प्रकरण 'मानसोल्लास' या जुन्या ग्रंथांत आलें आहे त्याचा परिचय करून घेऊं.

## राज्याच्या स्नानविधीला लागणारीं सुगंधी द्रव्यें

सुमारें १२ व्या शतकांत होऊन गेलेल्या राजा सोमेश्वरानें आपल्या 'मानसोल्लास' (इ. स. ११३०) या ज्ञानकोशासारख्या ग्रंथांत अनेक भोगांचें व भोग्य वस्तूंचें वर्णन केलें आहे. त्या ग्रंथांतील चार प्रकरणें राजानें कोणतीं सुगंधी द्रव्यें वापरावीं या विषयाला दिलीं आहेत.

हिंदुस्थानांत स्नानाला फार महत्त्व असून हिंदुधर्मानें स्नानाला शुचिर्भूत करणारें नित्य कर्म इतकें त्याला धार्मिक कर्मांत महत्त्वाचें स्थान दिलें आहे. आयुर्वेदीय ग्रंथांतून तर शारीरिक आरोग्य व मनाची प्रसन्नता याकरितां स्नानविधीची आवश्यकता वर्णिली आहे. साहजिकच राजा सोमेश्वरानें राजाच्या स्नानविधीच्या प्रक्रियेचें व त्या स्नानाला लागणाऱ्या सुगंधी द्रव्यांचें तपशीलवार वर्णन केलें आहे (मानसोल्लास व्हॉ. २, पानें ८१-८३). त्याचा सारांश पुढें दिला आहे.

"राजाचें स्नानगृह राजवाड्याच्या ईशान्य बाजूला असावें. त्याचें छत, खांब आणि भिंती सुंदर नानाविध रंगांनीं रंगविलेल्या असाव्यात. राजानें स्नानगृहांत येऊन बसल्यावर, केतकीगर्भाप्रमाणें सुंदर तेजस्वी नखें असलेल्या आपल्या नाजूक हातांच्या तळव्यांनीं तरुण परिचारिकांनीं राजाच्या अंगाला सुगंधी औषधी तेल लावावें. तेल अशा रीतीनें लावावें कीं राजाच्या हर्षभावना उद्दीपित झाल्या पाहिजेत. नंतर अंगाला लावलेलें तेल संवाहनकुशल मल्लांनीं राजाचें अंग हळुवार हातांनीं मर्दन करून जिरवावें.

अंगसंवाहना करितां जें तेल वापरावयाचें तें तेल तयार करण्याची पद्धत अशी : तीळ घेऊन, त्यांना केतकी, जाति, पुन्नाग आणि चंपक या फुलांचा भरपूर वास द्यायचा. मग ते तीळ यंत्रांत घालून गाळायचे. ह्या गाळलेल्या तेलाला वापरलेल्या फुलांचा मधुर सुवास येत असतो.

"राजाच्या अंगाला जें उटणें लावायचें तें तयार करायचें असें : पालक, तगर, मांसी (Muskroot); वाजिगंधा किंवा अश्वगंधा, पुष्कर, कोष्ठ (Costus) पटोलक, मुस्ता निशाद्वय (दोन प्रकारची हळद), ग्रंथिपर्णें या औषधी वनस्पती गोळा करून त्यां सावलींत वाळवावयाच्या आणि त्यांची पूड करून मिश्रण तयार करावयाचें. या मिश्रणांत निंब, राजवृक्ष, तुलसी, आर्जक यांचीं पानें वाटून त्यांचें उटणें तयार करून तें त्या मिश्रणांत, मिसळावयाचें. या सबंध मिश्रणांत, एला, जाति, सर्षप, तीळ, कुस्तुंबर, बाकुचि आणि चक्रमर्द यांचे दाणे घेऊन त्यांचा कुट्टा मिसळावयाचा. या मिश्रणांत शिवाय लवंगा, पद्मक, लोध्र, श्रीखंड (चंदन), सुरदारु, अगरु आणि सरल यांची पूड मिसळावयाची. यानंतर त्या उटण्याच्या मिश्रणांत नागकेशर, पुन्नाग, कांति, कुंकुम (केशर) आणि चंपक यांच्या फुलांची पूड करून घालावयाची. शेवटीं गुग्गुलु, सैंधव, बोल, सर्जरस या वस्तू पाण्यांत किंवा तांदुळाच्या कांजींत कोळ करून तो या मिश्रणांत मिसळावयाचा. असें तयार झालेलें उटणें राजाच्या अंगाला चोळून चोळून लावावयाचें.

"उटण्यामुळें अंगाला आलेला चिकटा घालवण्याकरितां, एक खली म्हणजे साबणाच्या वडीसारखी वडी वापरावी. ही वडी बनवायची रीत अशी होती : उत्तम गव्हाची कणीक घ्यायची. तींत तांदुळांची दाट आंबवलेली कांजी (अरनाल), मदन नांवाच्या वनस्पतीच्या मुळाची पूड आणि पिशुन म्हणजे केशर हीं मिसळून त्यांच्या वड्या तयार करावयाच्या.

"खलीनें चिकटा घासून काढल्यावर राजानें सुंदर परिचारिकांच्या मदतीनें स्नान करावें. स्नानाला पाणी स्वच्छ असावें व नाना तीर्थक्षेत्रांतून आणिलेलें तीर्थजल असावें. अंगाला सुखद वाटेल इतकें ऊन असावें. हें पाणी सुवासिक करून पत्र्याच्या घंघाळांतून साठवून ठेवावें. नंतर राजाच्या सेविकांनीं तें पाणी सोन्याच्या व चांदीच्या चकाकणाऱ्या कळश्यांत भरून राजांवर ओतावें. पाणी ओततांना सेविकांनीं राजाकडे







तोंड करून ओतावें. या सेविकांनीं राजाच्या डोक्यावरील केस अमलका- ( आंवळा ) च्या गिरापासून बनविलेल्या सुगंधी उटण्यानें माखून व चोळून ते सुखस्पर्श उष्ण तीर्थजलानें स्वच्छ धुवून टाकावेत. नंतर परिचारिकांनी राजाच्या अंगाला हरिद्रेचें ( हळदीचें ) सुगंधीं बनविलेलें उटणें राजाच्या अंगाला फासावें व किंचित् थंड पाण्यानें तें धुवून टाकून राजाचें अंग स्वच्छ पुसून काढावें. नंतर राजानें आपली ओली वस्त्रें सोडून स्वच्छ पांढरीं नेसावींत. ”

## गुलाबपाणी, गुलाब-अत्तर

गुलाबाचा मूळ अर्थ ( गुल+आब ) गुल=फूल व आब=पाणी म्हणजे ‘ गुलाबपाणी ’ असा आहे. परंतु गुलाब म्हणजे गुलाबाचें फूल हाच अर्थ रुढ झाला व त्याच अर्थानें प्रस्तुत लेखांत तो वापरला आहे.

गुलाब-पाणी व गुलाब-अत्तर यांचा इतिहास पहावयाचा झाल्यास तो अलीकडच्या काळांतून मागें मागें पहात जाणें सोयीचें होईल. म्हणून तीच पद्धत येथें अवलंबिली आहे.

‘ चूर्णप्रकरण ’ या नांवाच्या एका ग्रंथाचें इ. स. १८४९ सालचें हस्तलिखित सांपडलें आहे. त्यांत गुलकंद कशाचा बनवावा याची प्रक्रिया दिली आहे :

“ गुलकंद करणें ॥ साकर धुवा १ खडी मिश्री १ गुलाब फूल व केशर ॥ ६ ॥ चूर्ण ॥ ” ( खडीसाखर, गुलाबाचीं फुलें व केशर ).

रघुनाथ गणेश नवहस्त हे समर्थ रामदासांचे समकालीन होऊन गेले. त्यांच्या ‘ भोजनकुतूहल ’ नांवाच्या ग्रंथाची तीन हस्तलिखितें उपलब्ध आहेत : ( १ ) इ. स. १६८० चें ( २ ) इ. स. १८०३ चें ( ३ ) इ. स. १८५१ चें. ‘ भोजनकुतूहला ’ च्या पहिल्या परिच्छेदांत ‘ पानीय वर्ग ’ या नांवाचा विभाग असून त्यांत निरनिराळ्या पाण्यांचे गुणधर्म दिले आहेत. हा ‘ पानीयवर्ग ’ सर्व हस्तलिखितांतून सांपडतो. पण या पानीय वर्गांत समाविष्ट होणारा ‘ गुलाबोदकप्रकरण ’ हा भाग फक्त १८५१ च्या हस्तलिखितांतच सांपडतो, बाकीच्या दोन हस्तलिखितांत सांपडत नाहीं. यावरुन असें अनुमान काढतां येतें कीं ‘ गुलाबोदकप्रकरणां ’ची नवीन भर या ग्रंथांत इ. स. १८०३ ते १८५१ च्या दरम्यान कोणीतरी घातली असावी. हें ‘ गुलाबोदकप्रकरण ’ ‘ नारिकेलगुणाः ’ व ‘ उषःपानादिगुणाः ’ या दोन प्रकरणांमध्यें आलें असून, त्यांत गुलाबपाणी कसें तयार करतात, त्याचे औषधी गुण कोणते याचें दिग्दर्शन केलें आहे. त्यांचा सारांश असा :

“ पाणी रुप्याच्या किंवा तांब्याच्या भांड्यांत घालून ठेवावें. त्यावर दोलायंत्र बसवावें. दोलायंत्राला जोडून वर रौप्यपात्र ठेवावें व तें रुप्याच्या थाळीनें झाकावें. पात्राभोंवतीं मंदाग्नि ठेवून आंतील मिश्रण चांगलें उकळावें. कांहीं वेळानंतर रौप्यपात्रांत पाणी जमलेलें असेल तें गोळा करून घ्यावें. हें पाणी त्या पुष्पांचा उत्तम रस किंवा सार होय. हा फार शीतल व सुगंधी असून त्याला ‘ गुलाब ’ असें उत्तम नांव आहे. तें उन्हाळ्यांत व पावसाळ्याच्या शेवटीं दाहशमनार्थ उपयोगीं पडतें. हें गुलाबपाणी दाह, थकवा इत्यादि पीडा, वान्ति, मूर्च्छा, मुखरोग यावर गुणकारी असून तहान, पित्त, कफ यांचे दोषहि नाहीसे करतें व अरुचि नाहींशी करून चिरकाल तृप्ति देतें. ” [५]

---

५. अथ गुलाबोदकं तत्प्रकरणं ... ......
कुडवं शतपर्णानां विवृतं तत्र निक्षिपेत् ।
जलं सप्तपलं पात्रे रौप्ये वंगं सुसंस्कृते ॥
ताम्रजे वाथ तस्योर्ध्वे दोलायंत्रे निवेशयेत् ।
रौप्यपात्रे तदूर्ध्वं तु पश्चाद्रौप्यशरावया ॥
आच्छाद्य तन्मुखं रुद्ध्वा समंतात्पाचयेच्छनैः ।
मृद्वग्निना मुहूर्तं तु पश्चादुद्धृत्य तज्जलम् ॥
रौप्यपात्रस्थितं विद्वानेष पुष्परसो वरः ।
सुसीतलः सुगंधश्च ग्रीष्मे वर्षात्यये तथा ॥
राज्ञा दाहप्रशान्त्यर्थं गुलाबपरमाभिधः ।







हे श्लोक जरी प्रक्षिप्त असले तरी एवढें खरें कीं गुलाबपाणी तयार करण्याची पद्धति वर्णन करणारे हे श्लोक सध्यां उपलब्ध असलेल्या संस्कृत वाङ्मयांत तरी सर्वांत जुने असावेत. " वैद्यकीय ग्रंथांतून गुलाबपाणी व त्याचें औषधी उपयोग वर्णन करणारे सांपडतात कां ? " असें मी सुप्रसिद्ध वैद्य गंगाधरशास्त्री गुणें यांना विचारलें होतें.. पण 'असे उल्लेख आढळत नाहींत असें त्यांनीं मला कळविलें त्यावरून वरील निष्कर्षास दुजोराच मिळतो.

फ्रॅन्सिस बुकॅनन नांवाच्या इंग्रजानें आपल्या 'Patna –Gaya Report' (इ. स. १८११-१८१२) या पुस्तकांत त्याच्या वेळीं हिंदुस्थानांत गुलाबपाणी व सुवासिक तेलें व अत्तरें यांचें उत्पादन कसें होत असे, त्यांचा व्यापार केवढा चालत असे, गुलाबांचे मोठमोठे बगीचे कसे राखले जात असत, यांचे वर्णन केलें आहे. भारतीय गंधशास्त्राच्या इतिहासाच्या दृष्टीनें बुकॅननें दिलेला वृत्तांत फार माहितीपूर्ण व उद्बोधक आहे. म्हणून त्यांतील कांहीं माहिती पुढें संकलित करून दिली आहे :

" गंधी लोक गुलाबपाण्याचा व सुवासिक तेलें व अर्क यांचा व्यापार करतात १०० रु ते १००० रु. पर्यंत एकेकाचें भांडवल असतें. एकट्या पाटणा शहरांत गुलाबपाणी व सुवासिक अर्क यांचे ८ व चमेलीच्या तेलाचे ३ कारखाने आहेत पाटण्याहून ४००० रु. ची सुवासिक तेलांची व अर्कांची निर्यात होते. सुवासिक तेलांचे व अत्तरांचे हे कारखानदार ओरडत असतात कीं ' हल्लीं किंमती फार घटल्या आहेत व माल फार पडून आहे ' पण त्यांवर कोणीहि विश्वास ठेवीत नाहीं. त्यांचा धंदा उत्तम चाललेला दिसून येतो. त्यांच्या कारखान्यांतून एक मोठें तांब्याचें पात्र असतें. त्यांत १५० ते २०० पौंड पाणी मावतें. त्या पात्रांत एक काटकोनी वांकवलेली काचेची नळी बसविलेली असते. या नळींतून वाफ एका दुसऱ्या तांब्याच्या गोल भांड्यांत (cucurbit) मध्यें सोडतात. हें दुसरें तांब्याचें पात्र एका रुंद तोंडाच्या मातीच्या रांजणांत ठेवलेलें असतें. त्या रांजणांतल्या गार पाण्यानें ती वाफ गोठते. (वर ' भोजनकुतूहल ' ग्रंथाच्या एका हस्तलिखितांतील संस्कृत श्लोकांतून वर्णिलेल्या गुलाबपाण्याच्या दोलायंत्राची बुकॅननें केलेल्या वरील वर्णनावरून आठवण होते. तें दोलायंत्र असेंच ' ताम्रज ' म्हणजे तांब्याचें असतें. गुलाबपाण्याला संस्कृत श्लोकांतून ' गुलाबपरमाभिधः पुष्पद्रवः ' असें नांव असून तें ' सुशीतल ' व ' सुगंध ' आहे असें त्याचें वर्णन केलें आहे. संस्कृत श्लोकांतून उल्लेखिलेल्या रौप्यपात्रांचा व रौप्यशरावांचा मात्र बुकॅननच्या वर्णनांतून उल्लेख आढळत नाहीं ).

" कारागीर कारखान्यांतून तीन प्रकारचें सुवासिक पाणी तयार करतात : गुलाब, केवडा आणि लिंबू. यांत गुलाबाचेंच जास्त असतें. गुलाबपाण्यांतहि दोन प्रकार असतात : एकदां आटवून गाळलेलें ( Singledistilled) आणि दुसऱ्यांदा आटवून गाळलेलें. (double-distilled ). गुलाब ताजे वापरतात. एकदां गाळलेल्या गुलाब-पाण्याची किंमत घाऊक १२ ते १३ रु. मण, व किरकोळ रु. १६ ते २०. मण सुमारें ७६ पौंडांचा असतों. कांहींच्या मतें, एक मण पाणी एकदां गाळायचें म्हणजे त्या करितां २२००० गुलाब व ५६ शेर पाणी लागतें. त्यांपैकीं ४० शेर पाणी आटवून कमी करायचें. दुसऱ्यांदा गाळलेल्या गुलाबपाण्याची किरकोळीनें किंमत शेरास २ रु. असते. शेर म्हणजे सुमारें १$\frac{९}{१०}$ पौंड. याची मागणी युरोपियनांकडूनच असते. म्हणून मागणी असेल त्याप्रमाणेंच तें बनवतात.

" सुवासिक अर्क काढून मिसळायला आधारभूत तेल म्हणजे मुख्यतः चंदनाचेंच वापरण्याचा प्रघात आहे. कारण चंदनी तेलाच्या ठिकाणीं गुलाब पाण्याचा सर्व सुवास ओढून घेण्याचें सामर्थ्य आहे. गुलाबाचें अत्तर विशेष लोकप्रिय आहे. तें चंदनी तेलावरच काढतात. रुपया भार अत्तरास त्याच्या प्रतीप्रमाणें १ रुपया पासून ५० रु. अशी किंमत पाटण्याला आढळून येते.

---

पुष्पद्रवः सुरभिसीतकषायगौल्यो
दाहश्रमार्तिवमिमोहमुखामयघ्नः ।
तृष्णार्तिपित्तकफदोषहरः सदश्च
संतर्पणं चिरमरोचकहारकश्च ॥ "








" कांहीं गांवचे, उदा० बर शहराचे कारागीर चमेलीच्या फुलांचा वास तेलाला देतांना, तो वाफ करून गाळलेल्या तेला- ( distilled oil ) ला देण्याऐवजीं तेलघाण्यांत तेल ज्या तिळापासून काढतात त्या तिळांना देतात. फुलांचा बहरण्याचा मोसम ज्याकाळीं असेल त्या ऋतूंत, ८२ शेर किंवा सुमारें १६९ पौंड तीळ घेतात. त्या तिळांचे निम्मे निम्मे असे दोन भाग करितात. एका भागांत जितकीं ताजीं फुलें मिळूं शकतील तेवढीं मिसळतात; साधारणतः फुलांचें वजन तिळांच्या $\frac{१}{४०}$ ते $\frac{१}{४}$ असतें. दुसऱ्या दिवशीं तीं शिळीं झालेलीं फुलें तिळांच्या दुसऱ्या भागांत मिसळतात. असें संबंध ऋतूभर चालतें. ऋतु सुमारें तीन महिने असतो. या तीन महिन्यांत मिसळलेल्या एकंदर फुलांचें वजन एकंदर तिळांच्या वजनाएवढें होतें. तिळांच्या दोन भागांपैकीं एक भाग केवळ ताज्या फुलांनीं सुवासित झालेला असतो तर दुसरा भाग शिळया फुलांनीं. नंतर तीळ तेलघाण्यांत गाळतात. तिळांच्या केलेल्या दोन भागांपैकीं प्रत्येक भागापासून गाळलेलें तेल सुमारें १२ शेर किंवा २४ पौंड भरतें. ताज्या फुलांनीं सुवासित झालेल्या तिळांच्या तेलाचा भाव शिळया फुलांनीं सुवासित झालेल्या तिळांच्या तेलाच्यापेक्षां दुप्पट असतो. असें म्हणतात कीं, उत्तम प्रकारचें १२ शेर तेल सुमारें ९६ शेर साध्या तिळेल तेलांत मिसळतात. आणि हें मिश्रण आठ आणें शेराप्रमाणें विकतात. म्हणजे मिश्रणामागें ५४ रु. मिळतात. निकृष्ट तेलाच्या एवढ्याच वजनाच्या मिश्रणामागें २७ रु. मिळतात. म्हणजे एकंदर किंमत ८१ रु. मिळते. ही जी किंमत मिळते तिची प्रत्यक्ष लागलेल्या खर्चाशीं तुलना करतां किती मोठा नफा रहातो हें दिसून येतें.

खर्चाचा अंदाज असा :

| | |
|---|---|
| १ रुपयास २५ शेर तीळ, त्या | रु. आ. पै. |
| भावानें ८२ शेरांची | किं. ३– ५– ९ + |
| ४४ शेर तिळेल तेलाची | किं. १२–१२– ० + |
| २ मण फुलांची | किं. १२– ०– ० + |
| तेलघाण्यांतून तेल गाळण्याचा खर्च | ०– ८– ० |
| एकंदर खर्च | २८– ९– ९ |

म्हणजे नफा रु. ५२–६–३ इतका रहातो. त्यामुळें या गंधींची सांपत्तिक स्थिति चांगली असतें. "

ब्रिटिश लोक ज्या वेळीं हिंदुस्थानांत आले, त्या वेळीं युरोपियनांची व्यवहारी व्यापारी दृष्टि या सुगंधी द्रव्यांच्या धंद्याकडे किती लोभानें बघूं लागली हें बुकॅननच्या वरील हकीगतीवरून दिसून येतें. याचा परिणाम लवकरच असा झाला कीं, युरोपियन राष्ट्रांनीं सुगंधी द्रव्यांच्या व्यापारांत शिरून तेथून हिंदुस्थानला उठविलें व सर्व व्यापार काबीज करून आपल्या ताब्यांत घेतला. खरोखरीं, सुगंधी द्रव्यांची हिंदुस्थानांतील बाजारपेठ परकीयांच्या ताब्यांत जाण्यापूर्वी, हिंदुस्थानांत सुगंधी द्रव्यांचा व्यापार अत्यंत भरभराटलेला होता. कनौज, जयपूर, गाझीपूर येथें मोठमोठे सुगंधी द्रव्यांच्या कारखान्यांचीं केंद्रें होती असा उल्लेख फिरदौशीच्या शहानामा या ग्रंथांत ( इ. स. १०३० ) आढळून येतो. साहजिकच हे कारखानदार चांगले गब्बर बनले होते.[६]

बिहार व उत्तरप्रदेशमध्यें गुलाबी पाणी, तेल व अत्तर यांचे कारखाने होते असा उल्लेख वर आला आहे. त्याकरितां गुलाबांच्या बागांची वा मळ्यांची लागवड मोठ्या प्रमाणावर होत असली पाहिजे, हें उघड आहे. वर उल्लेखिलेला इंग्रज लेखक बुकॅनन यानें आपल्या उपरिनिर्दिष्ट ग्रंथांत त्याविषयींहि माहिती दिलेली आहे. ती थोडक्यांत अशी– " पाटणा व बर या ठिकाणीं गुलाबांच्या बागांतून गुलाबाची पैदास होते. या मुलुखांत गुलाबाच्या लागवडीखालीं एकंदर जमीन ५० बिघे किंवा ३४ एकर आहे. दोनशें-तीनशें बागवाले मालक आहेत. प्रत्येकाजवळ साधारणपणें दोन ते दहा कठ म्हणजे $\frac{१}{१५}$ ते $\frac{१}{३}$ एकर जमीन असते. पावसाळ्यामध्यें फांद्या कापून वाफ्यांत लावतात. त्या रुजल्यावर तीन-चार रोपें घेऊन तीं एकत्र एकाच लहान खड्ड्यांत लावतात. हे लहान खड्डे २-३ क्युबिट ( १ क्यु =१८·२२ इंच ) अंतरावर असतात. दोनतीन वर्षांनीं रोपें खची करतात. फुलांचा बहर फेब्रुवारीच्या मध्यापासून ते मेच्या मध्यापर्यंत येतो. युरोपांतल्या मानानें येथील फुलें लहान असतात. एका रुपयास १००० ते ४००० फुलें अशीं विकतात. "

६. " An uptodate Survey of Indian Perfumery Industry ', हा डॉ. सद्गोपाल यांचा ' Indian Soap Journal ' ( जुलै-सप्टें. १९४३ ) मधील लेख पहावा.








ग्वाल्हेरचे दौलतराव शिंदे ( इ. स. १७८०–१८२७ ) हे रसिक अभिरुचीचे राजे होऊन गेले. त्यांना बागबगीचांचा मोठा षोक होता. ग्वाल्हेरचा सुप्रसिद्ध ' फुलबाग ' त्यांनींच लावला. त्यांच्या दरबारीं असलेल्या शिव कवि नांवाच्या कवीनें ' बागविलास ' नांवाचें हिंदी काव्य रचलें आहे. त्या काव्यांत एके ठिकाणीं त्यानें चार प्रकारच्या गुलाबांचा उल्लेख केला आहे. हा कवि इंग्रज इतिहासकार बुकॅननचा समकालीन आहे. बुकॅननने गुलाबासंबंधी केलेल्या ऐतिहासिक वर्णनाला त्याचा काव्यमय दुजोरा मिळतो. त्याच्या काव्यांतील तो उतारा असा :

" जल दे आश्विनमासमें, पुनि सुन लेइ जवाब ।
पूस मासमें कलम कर, सींचो सरस गुलाब ॥
आवे कली गुलाब में, तबको सुनो विधान ।
कृष्ण पक्ष भरि माघमें, नीर न दीजै जान ॥
पैबन्द सरस गुलाब को, अस सेवती सुजान ।
बहुरो सदा गुलाब को, जिगर एक अभिराम ॥ "

पेशवाईच्या काळांत गुलाबपाण्याचे व अत्तराचे उल्लेख सांपडतात. सातान्याच्या शाहूमहाराजांनीं ( इ. स. १७२३ ) कान्होजी आंग्र्याकरवीं ब्रिटिशांकडून गुलाबपाण्याच्या वीस बाटल्या मागविल्याचा उल्लेख आहे. कर्नल फ्रेडरिक यांना परशुराम भाऊ भेटावयास गेले असतांना जो दरबार भरला होता त्या दरबारांत बन्याबापू मेहेंदळे एका हातांत तरवार व दुसऱ्या हातांत ढाल घेऊन प्रवेश करते झाले व त्यांना शिष्टाचाराप्रमाणें गुलाब– अत्तर व गुलाबपाणी दिले असतां त्यांनीं तें आपल्या ढालीला कसें लावून घेतलें व ढाल नाकाशीं आणून त्याचा कसा ऐटीनें वास घेतला याचें वर्णन कॅप्टन एडवर्ड मूर यानें केलें आहे[७] ( इ. स. १७९४ )

नानासाहेब पेशवे यांच्या प्रीत्यर्थ रचलेल्या काव्यांत कवि भगवंतराव यादव यानें " होती फार गुलाब चंपक तरू अरविंदहि सेविती " असा गुलाबाचा उल्लेख केला आहे.

नाना फडणीसांना दिलेल्या मेजवानीच्या वेळीं ( इ. स. १७९४,२१ जानेवारी ) अत्तरावर पांच रुपये खर्च झाल्याचा उल्लेख आहे.[८] शिवाजीमहाराजांनीं करवून घेतलेल्या 'राजव्यवहार कोशां'त (इ. स. १६७६) रघुनाथपंडितांनीं अत्तराचा अर्थ पुष्पसार असा दिला आहे.[९] जहांगिरची राणी नुरजहानं हिला अत्तराचा शोध लागला असें म्हणतात ( इ. स. १६१२ ). तिच्या विवाहप्रसंगीं राजवाड्याभोंवतालच्या उपवनांत गुलाबपाण्याचे पाट वहात होते, त्या पाटावरून तेलाचे तवंग वहात असतांना नुरजहानला दिसले व त्यांच्या मधुर सुगंधानें लोभावून तिनें तें भांड्यांत गोळा करवले. त्यालाच ' इत्र–इ-जहांगिरी असें नांव देण्यांत आलें.

शहाजहानच्या दरबारीं ( इ स. १६२८ ते १६५८) गुलाबपाण्याचा क्रीडामहोत्सव साजरा होत असे. ' हकीम फरासिरु ' नांवाच्या हस्तलिखित ग्रंथांत ( इ. स. १७८७ ) ह्या ग्रंथाचे भाग संस्कृत, मराठी, व हिंदी या भाषांतून रचलेले आहेत–गुलाबाचीं फुलें, गुलाबी अत्तर व गुलकंद यांचे उल्लेख आढळून येतात.

' अैनी-अकबरी ' मध्यें ( इ. स. १५९० ) अकबर बादशहानें सोनें, पारा, रेशीम कस्तूरीसारखीं सुगंधी द्रव्यें या वस्तू पारड्यांत टाकून आपली तुला करून घेतली असें लिहिलें आहे. अकबर बादशहाला सुगंधी द्रव्यांचा फार शोक होता. त्यामुळें ' अैनी अकबरी ' मध्यें सुगंधी द्रव्यांचे उल्लेख इतके मुबलक आले आहेत कीं सुगंधी द्रव्यांच्या इतिहासाभ्यासकाला त्यांचा उपयोग करून घेणें अपरिहार्य झालें आहे. नमुना म्हणून कांही उल्लेख देण्यासारखे आहेत.[१०] " अकबर-बादशहाचा बसायचा दिवाणखाना फुलांनीं, अंबर, अगरु ( aloes )याच्या धुपानें भरून टाकीत असत. धुपाटणीं सोन्या-चांदींचीं असत. स्वतः बादशहा आपलें डोक्यावरील केस सुगंधी तेलांनीं व शरीर उटण्यांनीं वारंवार माखून घेत असें गुलाबपाण्याच्या तर बाटल्यावर

७. ' Narrative ch. ' पान ३७७. ( London १७९४ ).
८. ' पेशवाईच्या सावलींत ' -- ना. गो. चापेकर ( पुणें १९३७ ) पान २१५.
९. ' अत्तरः पुष्पसारः स्यात् वस्तुसारोऽर्कनायकः ।
मकरन्दो गुलाबः स्यात् ...... ।' --भोग्यवर्ग ९२.
१० ' ऐनी अकबरी ' ब्लॅडविनचें इंग्रजी भाषांतर, पान १८५, ६५–७५.








बाटल्यांचा खच पडत असे. अबुल फझलनें ' नैसर्गिक सुगंध ' या शीर्षकाखालीं पुढील द्रव्यें निर्देशिलीं आहेत : ( १ ) माशांच्या पोटांतल्या भागापासून तयार होणारें अंबर ( २ ) सायप्रस बेटांतील झाडांपासून तयार केलेलें ' लौदन ' ( Laudan ) ( ३ ) कापूर ( ४ ) मांजरासारख्या प्राण्याच्या शरीरांत तयार होणारें कस्तूरीसारखें सिव्हेट ( Civet ) ( ५ ) तशाच प्रकारचें कौरा ( Kowrah ) ( ६ ) मिद ( Myd ) ( ७ ) ( Alres ) अगुरु नांवाच्या झाडाचें मूळ. ( ८ ) चुवा किंवा ( aloes चें ) अगुरूचें तेल. ( ९ ) चंदन ( १० ) सुगंधी शिंपा इत्यादि. वरील सुगंधी द्रव्यांमध्यें अंतर्भूत असलेल्या अगुरूचें तेल कसें काढावयाचें याची पद्धतीहि अबुल फझलनें वर्णन केली आहे : " alres किंवा अगुरूचे बारीक तुकडे करून ते एका अरुंद तोंडाच्या पात्रांत घालून ठेवावेत. त्या भांड्याचें तोंड माती, कापूस आणि भाताची कांजी यांच्यापासून बनविलेल्या चिकण लेपानें लिंपावें. मात्र लेप लिंपतांना भांड्याच्या तोंडाशीं एक बारीक छिद्र ठेवावें. मग हें भांडें उलटें करून दुसऱ्या एका तळाशीं भोक असलेल्या भांड्यांत तिवईवर ठेवावें. त्या भांड्याखालीं पाण्याची थाळी ठेवावी. नंतर उलट्या ठेवलेल्या भांड्याभोंवतीं गौऱ्यांचा मंद विस्तव इतका जळता ठेवावा कीं त्या भांड्यांतील अगुरूचे तुकडे उकळून वितळून जाऊन त्यांचें तेल खालीं पाण्यांत पडेल. हें गळणारें तेल गोळा करावें व त्यावर वारंवार गुलाबपाण्याचे सारखे हबके मारावे. हेतु हा कीं, त्या तेलाचा धुरकट वास नाहिंसा व्हावा."

वरील तेल गाळण्याच्या पद्धतीची यशोधराच्या ' यश प्रकाशसुधाकर ' नांवाच्या ग्रंथांत वर्णिलेल्या अधःपातनयंत्राशीं तुलना करणें उद्बोधक आहे. अधःपातनाची प्रक्रिया अशीः " ( रसायन घातलेली ) थाळी उलटी करून मातीच्या खड्ड्यांत पुरावी व त्यावर विस्तव पेटवावा. तीन प्रहरांनंतर खालीं पारा गळूं लागेल."[११]

अैनी-अकबरीनें कांहीं सुगंधी तेलांच्या व अर्कांच्या किंमतीहि दिल्या आहेत. अंबर एका तोळ्यास १ ते ३ रु., गुलाबपाणी बाटलीस ½ ते १ रु., जॅस्मिन फुलांचा अर्क बाटलीत ४ ते ८ रु. इत्यादि.- सर्व ऋतूंत वा कांहींच ऋतूंत फुलणाऱ्या सुमारें ४९ फुलांचा, त्यांच्या रंगांचा कोणत्या ऋतूंत तीं फुलतात त्या ऋतूंचा अबुल फजलनें निर्देश केला आहे. त्यावरून सुगंधी वस्तूंचा प्रचार व घोक मोंगल दरबारांतून किती होता याची कल्पना येऊं शकेल.

वर गुलाबांचा भारतांतील इतिहास ऐनी-अकबरीच्या काळापर्यंत म्हणजे सोळाव्या शतकापर्यंत दिग्दर्शित केला आहे. यापूर्वीच्या काळांतील भारतीय संस्कृत वा अन्य भाषांतील वाङ्मयांतून गुलाबाचे उल्लेख सांपडत नाहींत. परंतु जगांतील इतर कांहीं देशांच्या वाङ्मयांतून गुलाबाचे उल्लेख सांपडतात. उदाहरणार्थ, सुप्रसिद्ध ग्रीक इतिहासकार हेरोडोटस इ. स. पूर्व ४८४ यानें मिडास राजाच्या बागेंतील गुलाबांचे वर्णन केलें आहे; " या बागेंतील गुलाब इतके सुंदर व मधुर आहेत कीं त्यांची सर इतर कोणत्याहि गुलाबांना येणार नाहीं."[१२] ग्रीक वनस्पतिशास्त्राचा जनक थिओफ्रॅस्टस (इ. स. पूर्व २८७) याच्या वनस्पतींवरील ग्रंथांत गुलाबाचा अन्तर्भाव झालेला आहे. व्हर्जिल ( इ. स. पूर्व ७० ) च्या ग्रंथांतून गुलाबाच्या बगीच्यांचा उल्लेख असून, प्लिनी ( इ. स. २३ ) या रोमन इतिहासकारानें, रोमन लोक गुलाबाच्या पाकळ्यांचा व गुलाबपाण्याचा उपयोग

११. " अधःपातनम् --
पूर्वोक्तां स्थालिकां सम्यक् विपरीतां तु पंकिले ।
गर्ते तु स्थापितां भूमौ ज्वालयेन्मूर्ध्नि पावकम् ॥
यामत्रितयपर्यन्तं अधः पतति पारदः ।
अधःपतनयन्त्रं हि कीर्तितं रसवेदिभिः ॥' --[ पान. ७ ( आवृत्ति १९४० ) ]

१२. National Rose Society of England च्या Rose Annual for 1946 ( संपादक Courtney Page ) ( पानें ३१-३३ ) यांतील ' History of the Provence Rose ' हा लेख हा व पुढील उल्लेखांकारितां पहावा.



अनुक्रमणिका

कसा करीत याचें वर्णन केलें आहे. गुलाबाचीं पानें व पाकळ्या अतिमदिरापानामुळें उत्पन्न झालेल्या डोकेदुखीवर रामबाण होत असा रोमन लोकांचा समज होता. याच कारणामुळें, मेजवानीच्या शेवटीं पाहुण्यांवर गुलाब पाकळ्यांचा वर्षाव करण्याची आणि मदिरेमध्यें गुलाबपाकळ्या घालून ठेवावयाचा रोमन लोकांत प्रघात पडला असावा.[१३]

गुलाबपाणी व गुलाबाचा अर्क काढण्याची पद्धति इराणमध्यें उत्पन्न झाली, असें दिसतें. खलिफा मामून (इ. स. ८१०-८१७) याच्या अमदानींत याच्या राज्यांतील फार्सीस्तान नांवाच्या सुभ्याच्या सुभेदाराला दर वर्षी बगदादच्या खजिन्याकडे गुलाबपाण्याच्या तीन हजार बाटल्या पाठवाव्या लागत असा उल्लेख आहे. गुलाबपाण्याचे कारखाने शिराझला होते. गुलाबाचा अर्क काढण्याचा पहिला युरोपीय उल्लेख 'Joannes Actuarius' (इ स. १२७५) या ग्रंथांत सांपडतो.[१४] फुललेल्या गुलाबाच्या झाडाचें चित्र इ. स. १५११ चें उपलब्ध आहे.[१५] त्यानंतर १५९० मध्यें अकबराच्या वेळेला इराणमधून गुलाब नेऊन हिंदुस्थानांत मोठ्या प्रमाणावर लावले गेले असावेत.

वनस्पतिशास्त्राच्या इतिहासज्ञांच्या दृष्टीनें गुलाबाचा विकास सुमारें चार हजार वर्षांपूर्वीच्या (२००० इ स. पूर्व) रानटी गुलाबापासून हळुहळू उत्क्रान्ति होत होत झाला आहे.[१६] सर्व ऋतूंत फुलूं शकणारी चिनी गुलाबाची जात हिंदुस्थानांतून व इंग्लंडमधून इतर देशांत पसरली. इंग्लंडमध्यें तिचा प्रवेश १७८९ मध्यें झाला. चिनी गुलाबाची जात बंगालमध्यें लावली जाऊन तिला बंगाली गुलाब असें नांव प्राप्त झालें. बंगाली गुलाब सर्व ऋतूंत वाढूं व फुलूं शकतो[१७] गुलाबाचा जगांतील इतिहास इतका जुना म्हणजे दोन हजार वर्षांपूर्वीपर्यंत जात असून, त्याचा प्रसार इराण, बॅबिलोन, इजिप्त, ग्रीस, रोम इत्यादि देशांत झाला होता असें दिसतें. इतका त्याचा प्रसार असतांनाहि, व हिंदुस्थानाचे प्राचीन काळीं वरील देशांशीं अनेक प्रकारचें दळणवळण होतें हें लक्षांत घेतां, गुलाबाचा उल्लेख जुन्या संस्कृत वाङ्मयांतून सांपडूं नये हें खरोखरीं एक गूढच आहे.

गुलाबपाणी व गुलाब यांचा दाहशामक गुणधर्म लक्षांत घेऊन त्यांचा सुंदर काव्यमय उपयोग हिंदी कवि बिहारी (इ. स. १६०३-१६६३) यानें आपल्या 'सतसई' काव्यांत केला आहे :[१८]

"औंधाई सी सी सु लखि बिरह बरी बिललात ।
बीच हि सूखि गुलाब गौ छीटौ छु न गात ॥ "

("विरहताप शांत करण्याकरितां सखीनें जों गुलाबपाण्याची बाटली अंगावर ओतली तों सगळें पाणी नाहिंसे होऊन गेलें, शरीरावर एक बिन्दुहि उरला नाहीं.")

"झझकत हियै गुलाब के झमा झमावत पाइ"

("गुलाबाचीं फुलें आपल्या चरणावरून हळुहळुं फिरवीत असतांना, त्यांच्याहि क्लेशामुळें सखीचें हृदय कष्टी झालें" सखीचें शरीर इतकें सुकुमार होतें.)

"पखुरी लगै गुलाबकी
परि हैं अंग खरौंट"

("गुलाबाच्या नुसत्या स्पर्शानें देखील तुझ्या शरीराला ओरखडे पडतील.")

१३. 'Cyclopaedia of Perfumery' (लंडन, १९२५. संपादक : Parry) यांतील 'the Perfume of the Roses' हा लेख (पानें ६३०-६६४) पहावा.

१४. कित्ता.

१५. पान ६२. 'Plant Sciences' by Howard S. Reed अमेरिका १९४२ पहा.

१६. G. M. Taylor याच्या 'Roses, their Cultnre and management' (१९४५) या पुस्तकांतील 'Evolution of our Modern Roses' हें पहिलें प्रकरण पहावें.

१७. 'Practical Rosegrowing in India' बी. एस्. भट्टाचार्य (१९३५) पान. ८१.

१८. 'गाथासप्तशती' (काव्यमाला २१), संपादक : भट्ट मथुरानाथ (निर्णय सागर प्रेस, मुंबई १९३३). पान ५१.










**चंपकतैल ( इ. स. ५०० ते १८५० )**

चंपकाच्या किंवा चांफ्याचीं फुलें, त्यांचा सुंदरपीत सोनेरी रंग व मधुर सुवास[१९] प्रसिद्ध असून तीं साहजिकच भारतीयांना प्राचीन काळापासून प्रिय झालीं आहेत, असें दिसून येतें. या फुलांचा उपयोग स्त्रिया आपल्या केशभूषेकरितां करीत. शिवाय त्यांच्या पासून काढलेल्या ( चंपक ) तैलाचा अभ्यंगाकरितां म्हणजे अंगमर्दनाकरितां किंवा संवाहनाकरितां उपयोग होत असे. एक स्त्री चंपकतैलानें आपलें अंगमर्दन करीत असतांनाचें वर्णन एका सुभाषितांत केलें आहे : " छातीभोंवतीं पदर घट्ट लपेटून घेऊन नंतर तो कंबरेंत खोचून, ती अबला चंपकतैल आपल्या डोक्यावर शिंपडते व हळुहळु डोकें चोळते. नंतर दोन्हीं हात तेलानें माखून ती आपलें सर्व अंगाचें मर्दन करते. मर्दन करीत असतांना हातांतल्या कंकणांचा झणत्कार होत असतो-आणि प्रियकर प्रियेच्या दोन बाहूंमधील अंतर कौतुकानें न्याहाळीत असतो "[२०]

चंपकतैलाचा इतिहास अलीकडल्या काळापासून मागें मागें प्राचीन काळापर्यंत शोधावयाचा झाल्यास पहिला महत्त्वाचा अलीकडच्या काळांतील उल्लेख म्हणजे शिवाजी महाराजांनीं करवून घेतलेल्या ' राजव्यवहार-कोशां'तील ( इ स. १६५०-१६७४ ) होय त्यांत ' भोग्यवर्ग ' या प्रकरणांत इतर अनेक सुवासिक तेलांबरोबर ' चंपक तैल ' किंवा ' चांपेल ' याचा निर्देश आहे.[२१] त्या पूर्वीचा जुना महत्त्वाचा चंपक तैलाचा उल्लेख उपरिनिर्दिष्ट ' गंधसार ' आणि ' गंधवाद ' या ( सुमारें इ. स. १३०० ते १६०० ) ग्रंथांतील होत. त्यांत चंपकापासून चंपक तैल तयार करून तें इतरहि सौगंधिक द्रव्यांत मिसळीत असत, शिवाय चंपककलिका व चंपककुसुमें यांचा सौगंधिक चूर्णे व तेलें तयार करण्यांत उपयोग होत असे, असें वर्णन आहे. –याहि आधींचा चंपकाचे तेल व फुले यांचा ठसठशीत निर्देश सोमेश्वराच्या ' मानसोल्लासां'त (इ. स. ११३०) सांपडतो. ' चंपकाच्या उद्दाम गंधानें दरवळून निघालेले तीळ यंत्रांत घालून गाळावेत व तें तेल मर्दनाकरितां वापरावें' असें त्यांत म्हटलें आहे.[२२] याशिवाय राजानें ज्या फुलांच्या माळा घालावयाच्या त्यांत सुवासिक चंपक कुसुमांबरोबर इतर म्हणजे मल्लिका, उत्पल, पाटल हीं फुलें देखील सुवासाला विविधता आणण्याकरितां ओवावींत असेंहि ' मानसोल्लासां'त म्हटलें आहे.

जटासिंहपंडित नांवाच्या एका जैनपंडितानें ( इ. स. ७ वें शतक ) आपल्या 'वराङ्गचरित' नांवाच्या संस्कृत काव्यांत चंपकाचा अनेक वेळां उल्लेख केला आहे. एका श्लोकांत तो म्हणतो " प्रासादाच्या बाहेर विहारयोग्य अशा अनेक पुष्करिणी सुशोभित होत्या. त्यांच्या भोंवतीं प्रियङ्गु अशोका इत्यादींबरोबर चंपकवृक्षांचींहि वनें होतीं. "[२३]

---

१९. " The *Champaka* odours fail Like Sweet thoughts in a dream "
— Shelley.

२०. वक्षोजौ निबिडं निरुध्य सिचयेनाकुञ्चय मध्यं शनैः
कृत्वा चम्पकतैलसेकमबला संपीड्य मन्दं शिरः ।
पाणिभ्यां चलकङ्कणोद्यतझणत्कारोत्तराभ्यां करो-
त्यभ्यङ्गं परिपश्यतः सकुतुकं दोरन्तरं प्रेयसः ॥
-- सुभाषितरत्नभाण्डागार ( निर्णयसागर १९११ ) पान. २७७.

२१. " मल्लीतैलं मोरेलं चमेलीजातितैलकम् ।
तथा चंपकतैलं चांपेलमिति कीर्तितम् ॥ " १५.

२२. ' पुन्नागचंपकोद्दामगन्धसंवासितैस्तिलैः ।
यंत्रसंपीडितैस्तैलं गृहीत्वाऽभ्यङ्गमाचरेत् ॥ -- पान. ८१, ग्रंथखंड २.

२३. प्रियङ्ग्वशोकद्रुमकर्णिकारपुन्नागनागाशनचम्पकानाम् ।
वाप्यो विरेजुः सविहारयोग्या बहिःप्रदेशे भुवनोत्तमस्य ॥ ६१
—पान. २१९ ( डॉ. ए. एन्. उपाध्येसंपादित आवृत्ति )



अनुक्रमणिका








सुप्रसिद्ध ' कादम्बरी ' (इ. स ६३०) या ग्रंथाच्या ' उत्तरभागां 'त चम्पकदल मालिकांचा व चम्पकवृक्षांचा उल्लेख आला आहे. अमरकोशानें (इ स. ५०० ते ८००) चंपक वृक्षाला 'हेमपुष्पक' म्हटलें असून, त्यांच्या कलिकांना 'गंधफली'[२४] "सुवासानें घमघमणाऱ्या म्हणून सुवासिक द्रव्यांत वापरल्या जाणाऱ्या" असा निर्देश केला आहे. वर इ. स. १३०० ते १६०० सालच्या ग्रंथांतील उल्लेख आलाच आहे कीं, सुगंधी द्रव्यें, तेलें, चूर्णें तयार करण्यांत चंपककलिका किंवा चांपेकळ्या उपयोगांत आणीत असत. अमरकोशासारख्या (इ. स. ५०० ) जुन्या ग्रंथांत चंपककलिकेचें ' गंधफली' हें वर्णन अर्थपूर्ण मानल्यास अमरकोशाच्या पूर्वीपासूनच चंपककलिका व चंपककुसुमें यांना सुवासिक द्रव्यांत महत्त्वाचें स्थान होतें असें अनुमान करावयास हरकत नाहीं.

साधारणपणें अमरकोशाच्याच काळचा दुसरा महत्त्वाचा चंपकविषयक उल्लेख वराहमिहिराचा होय. त्यानें आपल्या बृहत्संहितेंत ' चंपकगंधितैल ' आणि ' चंपकामादेगंध ' याचा स्पष्ट निर्देश केला आहे. पुढें झालेल्या गंगाधराच्या ' गंधसार ' (इ. स. १३००-१६००) या ग्रंथांत हाच ' बृहत्संहितें'तील उल्लेख उद्धृत केलेला दिसून येतो.

याहि पूर्वीच्या काळांतील महत्त्वाचे उल्लेख पहावयाचे झाल्यास ते पुढील होत : सुश्रुतसंहितेमध्यें चंपकपुष्प हें रक्तपित्ताचा नाश करणारें, व कफनाशक होय असें त्याच्या गुणधर्मांचें वर्णन केलें आहे : (' चम्पकं रक्तपित्तघ्नं शीतोष्णं कफनाशनम् । ' सूत्रस्थान अध्याय ४६ पुष्पवर्ग -), आयुर्वेदीय ग्रंथांमधून तर असें म्हटलेलें आढळून येतें कीं, चंपक झाडाच्या काडीचें दांतवण वापरल्यास, जिव्हेचा (बोलण्यांतील) जडपणा कमी होऊन ऐकण्याची शक्तिहि सुधारते.[२५]

याहिपेक्षां प्राचीन उल्लेख महाभारतांतून आढळतो. आरण्यकपर्वांत (३-१५५-४४) गंधमादन पर्वताच्या परिसरांत चंपक, अशोक, केतक, बकुल या वृक्षांचीं बनें होतीं असें म्हटलें आहे. पतंजलीच्या (इ. स. पूर्व १५० ) व्याकरणमहाभाष्यांत (२ १. १.) चंपकपुट व मल्लिकापुट (चांफ्याची परडी मल्लिकांची परडी) असा उल्लेख आला आहे.

चंपकपुष्प हें भगवान् शंकराला विशेष प्रिय आहे अशी श्रद्धा तन्त्रवाङ्मयांतून आढळून येते.[२६]

### अंबर नांवाचें सुगंधी द्रव्य

(इ. स. ७००-१९०० )

अहमदाबादचे विद्वान् पंडित मुनि पुण्यविजयजी यांनीं माझ्याकडे एकदां अशी विचारणा केली :

"इ. स. बाराव्या शतकांत होऊन गेलेला जैन टीकाकार मलयगिरि यानें ' अंबर ' नांवाच्या सुगंधी द्रव्याचा उल्लेख केला असून, तें अगुरु, कर्पूर याप्रमाणेंच सुगंध म्हणून जाळतात असें म्हटलें आहे. सुगंधी द्रव्य म्हणून अंबराचे उल्लेख वाङ्मयांत फार क्वचित् सांपडतात. मलयगिरीनें उल्लेखिलेला ' अंबर ' हा सुगंधी पदार्थ कोणता असावा व त्याचे गुणधर्म कोणते असावेत ? "

या विचारणेप्रमाणें अंबराचा मागोवा घेत असतांना, असें दिसून आलें कीं, अमरकोशाच्या काळापर्यंत (इ. स. ५०० ते ८००) अंबराचा अर्थ ' सुगंधी द्रव्य ' असा माहीत नसावा. कारण अमरकोश अंबराचे दोनच अर्थ देतो : आकाश आणि वस्त्र. परंतु पुढच्या काळांत जे कोश होऊन गेले--उदा० शाश्वतकोश (इ. स. ७०० ते १००० ), विश्वकोश (इ. स. ११११), नानार्थार्णवसंक्षेप (इ. स. ११००-१२००), मेदिनीकोश (सुमारें इ. स. १२५०), अनेकार्थतिलक (सु. इ. स. ११७५ ते १४३४), विश्वलोचन कोश (सु इ. स. १३०० ते १६००), शब्दरत्न-

२४. ' चाम्पेयश्चम्पको हेमपुष्पक: । एतस्य कलिका गन्धफली स्यात् । '
' चम्पादेशे भवः चाम्पेयः । गन्धः फलमस्या इति गन्धफली ' -- क्षीरस्वामी.

२५. ' Aryan Medical Science ' (London 1896) यांतील पान ५९.

२६. चतुर्दश्यां च शुक्लायां ज्यैष्ठे मासि महेश्वरम् ॥
चम्पकैः पूजयेद्भक्त्या शिवलोकमवाप्नुयात् ॥
-- उत्तरकामाख्यतन्त्र (११ वें पटल) ' शब्दकल्पद्रुम ' या कोशांत ' चम्पकचतुर्दशी ' खालीं वरील श्लोक उद्धृत केला आहे.



अनुक्रमणिका

समन्वयकोश ( सु. इ. स. १६८५ ), या कोशांतून अंबराचा ' सुगंधक ' किंवा ' सुरभिद्रव्य ' किंवा ' सुगंधिद्रव्य ' असाहि एक अर्थ दिला आहे. शिवाजीमहाराजांनीं तयार करवून घेतलेल्या राजव्यवहारकोशा ' ( सु. इ. स. १६७६ ) मध्यें अंबराचा अर्थ ' मात्स्यिक ' ( माशापासून मिळणारा पदार्थ ) असा दिला असून कस्तूरीसारख्या सुवासिक द्रव्यांत त्याचा अंतर्भाव केला आहे. या उल्लेखांवरून असें दिसतें कीं, अंबर हें सुगंधी द्रव्य हिंदुस्थानांत सुमारें इ. स. ७०० नंतर प्रसार पावलें असावें. अरबी शब्द ' अन्बर ' याचा अर्थ अंबरग्रिस ( ambergris ) नांवाचें मेणासारखें सुवासिक द्रव्य. ' अन्बरा'चें ध्वनिदृष्ट्या साधारण सदृश अशा संस्कृत ' अंबरां'त रूपांतर झालें असावें.[२७] मुसलमानांच्या हिंदुस्थानांत आगमनानन्तर म्हणजे सुमारें १००० वर्षांपूर्वी ' अंबरग्रिस ' हिंदुस्थानांत प्रसृत झालें असें अनुमान करावयास हरकत नाहीं. अंबर या सुगंधी द्रव्याचा मागोवा संस्कृतेतर वाङ्मयांतून काढावयाचा झाल्यास तो असा संक्षेपानें मिळतो.

अैनी-अक्बरी ( इ. स. १५९० ) मध्यें अंबरग्रिसच्या धुपांनीं बादशहा अकबरचा दिवाणखाना अनेक वेळां सुगंधित करून टाकीत असत, असा उल्लेख आहे. अंबरग्रिसच्या उत्पत्ती विषयीं ऐनी अक्बरीनें त्यावेळच्या तीन प्रचलित समजुती दिल्या आहेत : १ तें समुद्राच्या तळाशीं निर्माण झालें असावें. २ समुद्रांतील प्राण्याची ती विष्ठा असावी किंवा ३ समुद्राच्या फेनापासून त्याची उत्पत्ति असावी. – दर तोळयास एक मोहर ते तीन मोहर अंबरग्रिसला किंमत पडते असें ऐनी अक्बरीनें म्हटलें आहे.

प्रसिद्ध प्रवासी टॅव्हर्निअर ( इ. स. १६७६ ) यानें आपल्या 'Travels of India' या पुस्तकांत 'अंबरग्रिसचे उल्लेख केले आहेत. " मोझँबिकचा गव्हर्नर दर तीन वर्षांनीं गोव्याला सुमारें ३०,००० पौंडाचें अंबर ग्रिस नेत असतो. " " गोव्याहून निघणाऱ्या पोर्तुगीज जहाजावरून प्रवास करणाऱ्या एका फ्रेंच गृहस्थाला (इ. स. १६२७) वाटेंत एका नदीच्या मुखाशीं स्नान करतांना अंबरग्रिसचा तुकडा सांपडला. त्याचें वजन ३३ पौंड असेल. जहाजावरील खलाशी व शिपाई त्याकरितां भांडावयास लागले. शेवटीं त्या जहाजाच्या कप्तानानें तो तुकडा पोर्तुगालच्या राजाला नजर केला व भांडण मिटविलें. "

बर्निअर ( इ. स. १६५६–१६६८ ) या प्रवाश्यानें हिंदुस्थानांत अंबरग्रिस मालदिव व मोझँबिक या प्रदेशांतून आयात होतें असें म्हटलें आहे. ' Lusiades ' ( इ. स १५७२ ) या पोर्तुगीज भाषेतील कवितेंत[२८] " कोठून आगतो कुणाला ठाऊक, पण हा उदार महासागर आफ्रिकेच्या वाळवंटी किनाऱ्यांवर सुगंधी अंबरग्रिस सारखा औतीत असतो" असें म्हटलें आहे.

मार्को पोलोनें ( इ. स. १२९८ ) आपल्या ' Travels ' या ग्रंथांत " अंबरग्रिस किनाऱ्यावर सांपडतें, व्हेल नांवाच्या माश्यांच्या आंतड्यांतून हें बाहेर पडलेलें असतें, सोकोत्रा नांवाच्या बेटावरील रहिवाशांचा भाल्यांनीं व्हेल मासे मारून त्यांच्या पोटांतून हें सुगंधी द्रव्य काढणें हा एक धंदाच होऊन बसला आहे, " असें वर्णन केलें आहे. मादागास्कर आणि झंझीबार या बेटांच्या किनाऱ्यांवरून अंबर खूप सांपडतें असाहि त्यानें उल्लेख केला आहे.

अंबर हें सुगंधी द्रव्य म्हणून संस्कृत वाङ्मयांतला एकमेव उल्लेख उपलब्ध आहे. तो उल्लेख ' गंधवाद ' नांवाच्या ( इ. स. १३०० ते इ. १६०० ) ग्रंथांत आहे.

---

२७. Prof. Dolgado – ' Portuguese vocables in Asiatic Languages, ' Trans. by A. X. Soares, G. O. Series, Baroda, 1936, p. 15.

२८. " On Africa's Strand ......
From calls unknown, here bounteous ocean pours
The fragrant amber on to Sandy shores "
ही कविता ' In Just of Spices ' ( S. E. Howe 1946 ) या पुस्तकांतून उद्धृत केली आहे.






प्रा. सुरेश म. डोळके

# डॉ. दप्तरींची ज्ञानसाधना* : पूर्वार्ध

## प्रास्ताविक

भाऊजींसारख्या विद्वद्रत्नाच्या ग्रंथांचा परिचय करून देण्याची जबाबदारी भाऊजींचे सुपुत्र श्री. यादवराव यांनीं माझ्यावर कां टाकावी हें अजूनहि माझ्या लक्षांत आलें नाहीं. कारण, एक तर भाऊजींचे ग्रंथ नवीन ज्ञानानें इतके परिपूर्ण आहेत की माझ्या-सारख्या अल्पज्ञाला त्यांचें आकलन होणें कठिण आणि दुसरें असें की, भाऊजींनी ज्ञानविज्ञानाच्या इतक्या विविध शाखांत इतक्या मूलगामी शोधांनी परिपूर्ण असलेले ग्रंथ लिहिले आहेत, कीं त्या सर्व शाखांचें सम्यक्ज्ञान असलेला संशोधक शोधूनहि आढळायचा नाहीं. आणि यामुळेंच, भाऊजींच्या ग्रंथांचा परिचय करून देण्याची आज्ञा यादवरावांनी जेव्हां मला केली, तेव्हां माझें मन शंकाकुल झालें. पण भाऊजींच्या तपःपुनीत व्यक्तित्वाविषयीं आणि त्यांच्या मूलगामी विचारपद्धतीविषयीं मला वाटत असलेला नितान्त आदर व्यक्त करावा या एकाच जाणिवेनें मी प्रस्तुत कार्याला उद्युक्त झालों. ऋषि-सहवासांत घालविलेल्या काळाचें पुण्यस्मरण करावें हाहि हेतु यांत आहेच.

विद्वद्रत्न डॉ. केशव लक्ष्मण ऊर्फ भाऊजी दप्तरी यांचा जन्म दि. २२ नोव्हेंबर १८८० रोजीं झाला; आणि काळपुरुषानें दि. १९ फेब्रुवारी १९५६ रोजीं, भीष्माचार्यांच्या निर्वाण–दिनीं उत्तरायणांतच, जीव-नाच्या क्षेत्रांतून या भीष्माचार्यांना हद्दपार केलें !

सॉक्रेटीसनें तत्त्वज्ञानाची व्याख्या मृत्यूचा अभ्यास अशी केली आहे. अमरत्वाचा शोध म्हणजे मृत्यूचा अभ्यास. या दृष्टीनें खरा ज्ञानी पुरुष हा मृत्युंजय असतो. 'वासनाक्षय' व ' एकात्मप्रत्ययसार ' या आंत-रिक प्रसादगुणांनी तो जीवन्मुक्तीची साधना करीत असतो. कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर हे भाऊजींचा उल्लेख नेहमी ' सॉक्रेटीससारखा तपस्वी ज्ञानी पुरुष ' असा करीत असत. भाऊजींच्या जीवनाकडे पाहिलें म्हणजे कोल्हटकरांच्या या उद्गारांची साक्ष मनाला पटते.

ज्ञानान्मोक्षाच्या साधनेंत सदैव मग्न असलेल्या या ब्रह्मर्षींच्या जीवनयज्ञांतून आविर्भूत झालेल्या ग्रंथांचें ज्योतिर्गणित, धर्मशास्त्र, समाजशास्त्र व वैद्यकशास्त्र असे स्थूल विभाग पडतात हें सुरुवातीलाच सांगितलें पाहिजे. यांपैकी प्रत्येक शास्त्रांत भाऊजींच्या ग्रंथांनी महत्त्वाची भर घातली आहे. ' कांही तरी नवीन किंवा प्रचलित माताहून वेगळें सांगावयाचें असल्याशिवाय माझी लेखणीच चालत नाहीं ' असें भाऊजी म्हणत असत. ' राष्ट्रहिताकरिता व जगद्हिताकरिताच आपण ग्रंथ लिहिले ' अशी भाऊजींची निष्ठा होती.

## विभाग १ : ज्योतिर्गणित

### ' भूमितिशास्त्र ' [ अप्रकाशित ]

[ लेखन : इ. स. १९०६ ]

भाऊजींचा हा पहिला ग्रंथ. १९०० सालीं बी. ए. झाल्यावर भाऊजींची लगेच इतिहास व न्यायशास्त्र या विषयांचे फेलो म्हणून मॉरिस कॉलेजांत नेमणूक झाली. त्यानंतर पटवर्धन हायस्कूलांत गणिताचे अध्यापक म्हणून काम करीत असतांना युक्लिडच्या भूमितींतील अप्रत्यक्ष सिद्धि ( Indirect Proof ) समजणें विद्यार्थ्यांना फार कठिण जातें असें त्यांना अनुभवास आलें. म्हणून, तशा प्रकारची सिद्धि जिच्यांत नाहीं अशी भूमिति भाऊजींनी तयार केली. यांत प्रत्यक्ष सिद्धीनेच ( Direct Proof ) सर्व सिद्धान्त सिद्ध केले आहेत.

या ' भूमितिशास्त्रा'चे तीन भाग आहेत. पहिल्या भागांत सरळ रेषा, कोन, त्रिकोण व इतर सरळ रेषा-कृति यांचा विचार असून क्षेत्रफळ काढण्याची रीति व समानकोन त्रिकोणांचे धर्महि यांत सिद्ध केले आहेत.

* कै. डॉ. दप्तरी यांच्या, दि. ११ जून १९६१ रोजीं प्रकाशित झालेल्या ' न्यासार्थ दीपिका ' या ग्रंथांतील प्रास्ताविक निबंध.



अनुक्रमणिका








दुसऱ्या भागांत वर्तुळाचा विचार असून त्रिकोणमिती-चाहि ( Trignometry ) अभ्यास आहे. तिसऱ्या भागांत आवश्यक तेवढा दीर्घ वर्तुळाचा विचार आहे.

या पहिल्याच ग्रंथांत भाऊजींच्या सूक्ष्म बुद्धीचा प्रत्यय येतो. आपल्या सिद्धान्ताच्या स्पष्टीकरणाकरिता भाऊजींनी यांत उदाहरणेंहि भरपूर दिलीं आहेत. गणितज्ञांच्या विचाराकरिता भूमितीक्षेत्रांत नवीन विचारसरणी मांडणारा भाऊजींचा प्रस्तुत ग्रंथ प्रसिद्ध होणें अवश्य आहे.

**' ग्रहगणितकुतूहल '** [ अप्रकाशित ]

[ लेखन : इ. स. १९१२ ]

कॉलेजांत शिकत असतांनाच भाऊजींचें लक्ष ग्रह–गणिताकडे व विशेषतः ' ग्रहलाघवा'कडे उत्कटतेनें वेधलें गेलें, व त्यांनी म. म. भट्टजीशास्त्री घाटे यांच्या-जवळ ग्रहलाघवाचा अभ्यास सुरू केला. घाटेशास्त्र्यांनी भाऊजींना ग्रहलाघवांतली बेरीजवजाबाकी शिकविली; पण गणिताची उपपत्ति शिकविली नाहीं. त्यामुळें ग्रह-लाघवांत सूर्यस्पष्टीकरणाचें जें गणित आहे त्याचा ' ग्रह दीर्घ वृत्तांत कांही विशिष्ट नियमानें फिरतात ' या आधुनिक सिद्धान्ताशी भाऊजींना मेळ घालता येईना. त्याकरिता त्यांनी ग्रहलाघवावरील ' मल्हारी दैवज्ञा'च्या टीकेचा कसून अभ्यास केला. पण तरीहि तो प्रश्न सुटेना.

दीर्घ वर्तुळांत फिरणाऱ्या ग्रहाचें गणित कसें होईल याचा अत्यंत सूक्ष्म व स्वतंत्र विचार करून भाऊ-जींनी दोन समीकरणें शोधून काढलीं. या दोन समी-करणांच्या साहाय्यानें गणित करून पाहतां उत्तर जुळे पण रीतीचा समाधानकारक उलगडा होईना. शेवटी या दोन समीकरणांचें एकच समीकरण कसें होईल हें भाऊ-जींनी शोधून काढलें. न्यूटनच्या गुरुत्वाकर्षणाच्या सिद्धान्तावरूनच, केवळ गणितानें, चंद्राच्या गतीचे ४० संस्कार पाश्चात्य गणकांनी कसे ठरविलें हें जोणून घेण्याची भाऊजींना फार उत्कंठा लागली. त्याकरिता त्यांनी ' लूनर थिअरी'चें एक पुस्तक मुद्दाम कलकत्या-हून मागवून त्याचा अभ्यास केला.

... आणि या सर्वांचा परिपाक म्हणून, ज्यावरून थोड्या कोष्टकांनी, त्रिकोणमितिसारख्या उच्च गणिताच्या ज्ञानाशिवाय, आधुनिक ज्योतिःशास्त्रानुसार, ग्रहाचें सूक्ष्म गणित श्रमांशिवाय करतां येईल असा, ' मेंदूचे तुकडे पडल्यासारखे वाटावे ' इतके प्रदीर्घ परिश्रम करून, १९१२ च्या अखेरीस ग्रहलाघवासारखाच ' ग्रहगणितकुतूहल ' नांवाचा ग्रंथ भाऊजींनी लिहिला. ज्योतिर्गणितांतील श्रम टाळण्यासाठी व सूक्ष्मता साध-ण्यासाठी भाऊजींनी या ग्रंथांत ग्रहगणिताच्या अनेक नवीन रीति शोधून काढल्या आहेत. ' ह्या ग्रंथासाठी लागलेल्या असह्य बौद्धिक श्रमांनी माझें रक्त, शक्ति व आयुष्य फार खालें, आणि अग्निमांद्य कायमचें जडलें ' असें भाऊजी म्हणत असत.

**' भारतीययुद्धकालनिर्णय '**

[ लेखन : इ. स. १९१३; प्रकाशन : इ. स. १९१८ ]

कै. शंकर बाळकृष्ण दीक्षित यांचा 'भारतीय ज्योतिः-शास्त्र' हा ग्रंथ वाचीत असतां " भारतांतील ग्रहस्थिति प्रत्यक्ष पाहून लिहिलेली आहे असा माझा विश्वास आहे, पण तिची उपपत्ति आम्हांस लावता येत नाहीं, ती उपपत्ति कोण कधी लावील ते लावो " या दीक्षितां-च्या वाक्यांनी भाऊजींच्या मनाची विलक्षण स्थिति झाली. आपण जर ही उपपत्ति लावू शकलों नाहीं व तीवरून भारतीय युद्धाचा काळ जर आपण ठरवू शकलों नाहीं तर आपलें ज्योतिर्गणिताचें ज्ञान व्यर्थ होय असें भाऊजींना वाटलें.– ही भावनाच या ग्रंथाची प्रेरकशक्ति होय.

या विषयाचे दोन भाग पडतात. एक, युद्ध कोणत्या वर्षी झालें आणि दुसरा, तें कोणत्या महिन्याच्या कोणत्या तिथीस झालें. हे दोन भाग स्वतंत्र नसून परस्परावलंबी आहेत व म्हणून त्यांचा स्वतंत्र विचार करणें युक्त नाहीं असें भाऊजी म्हणतात. भाऊजींनी आधी दुसरा प्रश्न सोडविला आणि ठरविलें कीं युद्ध कार्तिकाच्या अमावास्येस किंवा मार्गशीर्षांत सुरू झालें. या उत्तरांतल्या ग्रहस्थितीवरून भाऊजींनी आधी वर्ष नक्की ठरविलें. आणि वर्ष नक्की ठरविल्यानंतर महिना व तिथि निश्चित केली.

' चंद्रादित्यावुभौ ग्रस्तौ एकाह्नाह्नि त्रयोदशी ' या भीष्मपर्वांतील [ भी. प. ३–२८ ] किंवा ' सप्त-माच्चापि दिवसादमावास्या भविष्यति । संग्रामो युज्यतां तस्यां तामाहुः शक्रदेवतां ॥ ' [ उ. प. १४३–१८ ] या उद्योगपर्वांतील वचनांत ' त्रयोदशी








तिथीस एकाच वारीं चंद्र व सूर्य ह्या दोघांसहि ग्रहणें लागलीं व अमावास्येच्या दिवशीं भारतीय युद्ध सुरू झालें, असें म्हटलें आहे. वरील वचनांतील एकान्ह या शब्दाचा सतत तीन महिने विचार करून भाऊजींनी त्याचा अर्थ एकाच वारीं, म्हणजे १४ दिवसांच्या अंतरानें, असा लावला. कारण, एकाच दिवशी दोन्ही ग्रहणें होऊ शकत नाहीत व अथर्वज्योतिषांत वार सांगितले आहेत म्हणून त्याकाळीं वार माहित असणें अशक्य नाहीं. तेव्हांच्या राहूचा किंवा ग्रहणाचा व सूक्ष्म गणिताचा विचार करून, गणितानें येणाऱ्या कार्तिकाच्या अमावास्येस, परंतु वास्तविक मार्गशीर्ष शुद्ध द्वितीयेस, भारतीय युद्ध सुरू झालें असें भाऊजींनी ठरविलें आहे.

महाभारतांतील ग्रहस्थितिनिदर्शक वचनांचा परस्परांशी मेळ नाहीं. म्हणून भाऊजींनी त्या वचनांचे-* दोन संघ केले आहेत, एकाच पर्वांतील या परस्परविरुद्ध वचनांची संगति लावली आहे, व त्यावरून भारतीयुद्धाचें वर्ष १६९५·३ होय असें सिद्ध केलें आहे.

ग्रहणविचारावरून व भारतोक्त ग्रहस्थितीवरून हा काळ ठरविल्यानंतर भाऊजींनी युद्धाचा दिवस ठरविला आहे व १६९५·३ शुद्ध द्वितीया भौमवार या तिथीशी –बुधाची स्थिति, शुक्राची वक्रता आणि घोर प्रज्वलितता, मंगळाचें श्रवणाकडे झालेलें वक्रानुवक्रत्व, पांडव वनवासाला गेल्यापासून ३६ वें वर्ष लागण्याच्या सुमारास झालेलीं द्वारकेचीं दोन ग्रहणें इत्यादि महाभारतांतील इतर उल्लेखांचा तंतोतंत मेळ जुळवून दाखविला आहे.

ज्योतिषावरून येणाऱ्या या काळाशी पुराणोक्त [ भागवत स्कं. ९ अ० २२, ४५-४९, १२-१, २-३८; मत्स्यपुराण अ० २७२ श्लो. १७-३०, अ० २७२, १-३६, अ० २७३, १-१६; विष्णुपुराण अंश ४, अ० २३, १-३, अ० ४ अ० २४, १-१३; वायुपुराण अ० ९९, २९४–३५८; मत्स्यपुराण अ० २७३, ३५-३७ इ. इ. ] कालहि जुळतो असें भाऊजींनी पुराणांतील प्रद्योतन, शैशुनाग, मौर्य, शुंग, काण्व व आंध्र या राजांच्या वंशावळींवरून दाखवून दिलें आहे. या सर्वांचा विचार करून ते म्हणतात– 'हा युद्धकाळ म्हणजे शकापूर्वी १२७५·३ वर्षें –इसवी सनापूर्वी ११९७ वर्षें,– संवतापूर्वी ११४० वर्षें,– हा होय.'

'प्राप्तं कलियुगं विद्धि' या शल्यपर्वांतील [ अ० ६०, श्लो. २५ ] किंवा 'एतत्कलियुगं नाम अचिराद्यत्प्रवर्तते' या वनपर्वांतील [ अ० १४९, श्लो. ३८ ] वचनांवरून भारतीयुद्ध कलियुगाच्या आरंभाच्या सुमारास झालें असें ठरतें. त्यावरून कै. चिं. वि. वैद्य प्रभृति सनातनी पंडित, शकपूर्वी ३१७९ वर्षें कलियुग सुरू झालें या समजुतीनुसार, श. पू. ३१८० हा भारतीय युद्धाचा काल मानीत. भाऊजींना, अर्थातच, हें मत मान्य नाहीं. "भारतांतील ग्रहस्थिति व पुराणांतील वंशावळी या प्रमाणावरून कलियुगच शकापूर्वी १२७५ वर्षांनीं सुरू झालें व कलियुगारंभींची जुनी समजूत चुकीची आहे" असें भाऊजी म्हणतात

* महाभारतांतील ग्रहस्थिति

(संघ १ ला)
[ भीष्मपर्व अ० १७ श्लो० २ या वचनाशी सुसंगत असलेलीं वचनें— ]
'भीष्मपर्व', अ० ३, श्लो० १२, १६, १७, १८, १९
'उद्योगपर्व', अ० १४३, श्लो० ८, ९
'शल्यपर्व', अ० ११, श्लो० १७
'कर्णपर्व', अ० ९४, श्लो० ५१

(संघ २ रा)
[ तदितर वचनें ]
'भीष्मपर्व' अ० ३, श्लो० १४, १५



अनुक्रमणिका






[ वि. ज्ञा. वि. ४९–११, पृ. ४४४ ]. आपल्या या नवीन कालनिर्णयानें 'हरिवंशांत' सांगितलेल्या सर्व ग्रहणांची देखील उपपत्ति भाऊजींनी सुसंगत लावून दाखविली आहे.

इ. स. १९१३ त लिहिलेला प्रस्तुत प्रबंध १९१८ सालीं 'विविध ज्ञान विस्तारां'त प्रसिद्ध झाला. या प्रबंधांत प्रगट झालेलें भाऊजींचें ज्योतिषाचें सूक्ष्म ज्ञान पाहून कै. श्री. कृ. कोल्हटकर इतके कांहीं हर्ष-विस्मित झाले, कीं त्याच निमित्तानें मुद्दाम नागपुरास येऊन त्यांनीं महाराष्ट्रास अपरिचित असलेल्या या महापंडिताची भेट घेतली, भाऊजींच्या प्रगाढ विद्वत्तेबद्दल आणि नावीण्यपूर्ण व प्रत्ययोत्पादक विचारसरणीबद्दल त्यांचें अभिनंदन केलें व 'भारतीय ज्योतिःशास्त्र-निरीक्षण' हा जो दुसरा प्रबंध भाऊजींजवळ लिहून तयार होता, तो त्यांना वाचावयास मागितला.

लो० टिळकांचेंहि लक्ष भाऊजींकडे त्यांच्या या प्रबंधानेंच वेधलें गेलें. टिळकांनीं भाऊजींचा हा निबंध हस्तलिखित स्वरूपांतच वाचला होता. भाऊजींनी ठरविलेला भारतीयुद्धाचा काल टिळकांना मान्य होऊन शिवाय त्यांतील विवेचनहि त्यांना इतकें नावीन्यपूर्ण वाटलें कीं ता. १ सप्टेंबर १९१५ रोजीं कै. डॉ. मुंजे यांना पाठविलेल्या पत्रांत ते लिहितात —

" I have read and re-read Mr. Daftari's Mss. essay. The conclusion is in my opinion sound ... ... He has, no doubt, worked for himself and his essay contains some entirely new suggestions. Will he not translate it into English ? I should advise him to do so and publish in some Oriental Journal ......... '

## 'वैदिक कालगणना–पद्धति व श्रीरामचंद्रजन्मकालनिर्णय'

[ प्रकाशन : इ. स. १९२५ ]

भाऊजींनी ज्योतिर्गणितानें ठरविलेला भारतीय युद्धाचा काळ ( श. पू. १२७५ ) व 'भारतीय युद्ध कलियुगारंभी झालें' या महाभारतांतल्या वचनावरून निष्पन्न होणारा काळ ( श. पू. ३१८० ) यांत फरक पडल्यामुळें भाऊजींनी वायुपुराणाचा व प्राचीन युगपद्धतीचा फारच सूक्ष्म अभ्यास केला. या प्रदीर्घ अभ्यासांतूनच त्यांनी वैदिक कालगणनापद्धतीविषयी एक नवीच उपपत्ति अभ्यासकांसमोर मांडली व तिच्या अनुरोधानें 'श्री दाशरथी रामचंद्राचा खरा जन्मकाळ'हि शोधून काढला.

वायुपुराणादि प्राचीन इतिहासग्रंथांवरून व धर्मग्रंथांवरून भाऊजींनी प्रस्तुत प्रबंधांत असा सिद्धान्त मांडला आहे कीं, वैदिक कालीं दैवी व मानुषी अशा दोन युगपद्धति अस्तित्वांत होत्या. [ ऋग्वेद. म. १० सू. ७२; महाभारत, सौ. अ. १८; ऋग्वेद म. १ सू. १०३; ऋग्वेद- मं. ५, सूत्र ५२ इ. ]

सर्व पुराणांच्या मतें कलियुगाच्या दुप्पट द्वापार, तिप्पट त्रेता व चौपट कृत आहे. द्वापार, त्रेता, कृत या शब्दाचे जे अर्थ होतात त्यावरूनहि हेंच सिद्ध होतें. दैवी युगपद्धतींत ४००० वर्षांचें कृतयुग, ३००० वर्षांचें त्रेतायुग, २००० वर्षांचें द्वापार व १००० वर्षांचें कलियुग मानीत. हें दैवी द्वापारच शकपूर्व ३१८० मध्यें सुरू झालें. मानुषी युगपद्धतींत ४०० वर्षांचें कृतयुग, ३०० वर्षांचें त्रेता, २०० वर्षांचें द्वापार आणि १०० वर्षांचें कलियुग मानीत. मानुषी युगपद्धतीच्या कृतयुगाचा आरंभ शकपूर्व ३१८० हाच होता. अर्थात, मानुषी कृतयुगाच्या आरंभींच भारतीय युद्ध झालें.

वैदिक कालगणनापद्धतींत साधारण संवत्सर ३६० दिवसांचें व चवथें वर्ष ३८१ दिवसांचें घेत. वेदांग ज्योतिषांत ५ वर्षांचें युग मानलें आहे. त्याच्या पूर्वी तैत्तिरीय ब्राह्मणांत सांगितलेली [ १-४-१० ] चार वर्षांचीच युगपद्धति अस्तित्वांत असावी. चार वर्षांचें युग मानलें तर वायुपुराणांतील [ अ० ९८, श्लो० ८८, ८९, ९०, ९१, ९२, ९३, ] या वचनांची संगति फार उत्तम लागते व परशुराम व श्रीराम यांच्या जन्मामध्यें सुमारें २० वर्षांचें अंतर येतें. अशा चार वर्षांच्या म्हणजे १४६१ दिवसांच्या काळाला भाऊजींनीं 'अल्पयुग' असें म्हटलें आहे. प्रत्येक युगाच्या शेवटीं 'अश्वमेध' नांवाचा यज्ञ करीत. प्रत्येक तीन वर्षांनंतर चवथ्या वर्षी २१ दिवस जास्त येत असत. त्या २१ दिवसांचें प्रतीक अश्वमेधांतील २१ यूप होत.








१००० वर्षांनंतर एक द्वादशवार्षिक यज्ञ करण्यांत येई. भारतीय युद्धापूर्वी निदान ८ वर्षे अगोदर कलियुग सुरू झालें म्हणजे भारतीययुद्धापूर्वी सुमारें ४ वर्षें कलियुग सुरू झालें. ( पुराणांतील काळ दुपटीनें सांगितले आहेत ). भारतीययुद्धापूर्वी द्वादशवार्षिक यज्ञ एकदां झाला होता. अर्थात, ही युगपद्धति युद्धापूर्वी सुमारें १०००+४०० + ३००+२०० + ४ = १९०४ वर्षें सुरूं झाली असावी. युद्धाचा काळ भाऊजींनी श. पू. १२७५.३ हा ठरविला आहे. ज्याला कलिकाळ म्हणतात तो शकारंभी ३१८० वर्षें झाला होता. त्यांतून १२७५.३ वर्षें वजा केल्यास १९०४.७ येतात. त्यावरून ज्याला कल्पादि काळ म्हणतात, तो वास्तविक युगपद्धतीच्या आरंभाचा काळ असावा, असें भाऊजींचें मत आहे. ही कालगणनापद्धति भारतीयुद्धानंतर निदान ९२ कलि + ३८० कृत म्हणजे ४७२ वर्षेपर्यंत चालली होती.

या चार वर्षांच्या काळालाच चतुर्युग, कल्प, 'मन्वंतर' असें म्हणत असत.

सनातनी पंडित श. पू. ३१८० या काळीं दैवी कलियुग सुरू झालें असें मानतात. भाऊजींच्या मतें श. पू. ३१८० मध्यें दैवी द्वापर सुरू झालें. ज्योतिषकलिदेखील श. पू. ३१८० मध्येंच सुरू झाला. शकपूर्व ३१८० हा काल फार महत्त्वाचा आहे. त्या कालीं सर्व ग्रह अश्विनी नक्षत्राच्या आरंभी एकत्र झाले होते. या काळापासून व या आरंभकाळापासूनच भारतीय ज्योतिषी आपलीं सर्व गणितें करीत. अर्थात, ज्योतिषकलीहि श. पू. ३१८० मध्येंच सुरू झाला.

ज्योतिषांत ग्रहगति सांगतांना आणि तत्त्वज्ञानांत जगदुत्पत्तिलयाचा काळ सांगतांना दैवी युगपद्धतीचा उपयोग करीत असत. कारण, तेव्हां फार मोठा काळ सांगावयाचा असे. पण, इतिहास सांगतांना एवढ्या मोठ्या युगाचा उपयोग केल्यास कांहींच अर्थबोध व्हावयाचा नाहीं. उदाहरणार्थ, राम त्रेतायुगांत झाले असें दैवी पद्धतीनें म्हटलें तर १२,९६,००० वर्षांएवढ्या काळांत ते केव्हांतरी झाले असा अत्यंत अनिश्चित अर्थ करावा लागेल. किंवा रामानें ४० वर्षें राज्य केलें असें दैवी युगपद्धतीनें सांगताच यावयाचें नाहीं. म्हणून, पुराणग्रंथांत इतिहास सांगतांना मानुषी युगपद्धतीचाच उपयोग केला आहे.

'चतुर्विंशे त्रेतायां' या वायुपुराणांतील वचनावरून श्रीरामाचा जन्म त्रेतायुगांतील २४ व्या युगांत झाला. म्हणजे मानुषी कृतयुगाचा एक फेरा (४००+३०० +२००+१००) = १००० वर्षें + कृतयुग (४००वर्षें) + ४ वर्षांचा एकेक अशीं २३ युगें (९२ वर्षें) + १ वर्ष= १४९३. म्हणजे श्रीरामाचा जन्म कृतयुग सुरू झाल्यानंतर १४९३ या वर्षीं किंवा ( ३१८०–१४९३=१६८७ ) श. पू. १६८७ या काळीं झाला हें सिद्ध होतें. या काळाशी रामायणांत सांगितलेली सर्व ग्रहस्थिति उत्तम जुळते.

भाऊजींचा प्रस्तुत प्रबंध बडोद्याच्या 'सहविचार' मासिकांत १९२५ सालीं प्रसिद्ध झाला. या निबंधाच्या उपसंहारांत भाऊजी म्हणतात- "मानुष पद्धतीनें सांगितलेल्या इतिहासास दैवी पद्धति लाविल्यामुळें त्या इतिहासास फार वेडगळ स्वरूप आलें आहे. त्यामुळें पुराणें सर्व भाकड कथा असा समज झालेला आहे. या आपत्तीमधून पुराणांस सोडवावयाचें असल्यास त्यास आम्ही सिद्ध केलेली मानुषी युगपद्धति लाविली पाहिजे आणि असें केल्यास भारतीयांचा फार सुसंगत असा इतिहास पुराणांतून, विशेषतः वायुपुराणांतून उपलब्ध होतो." [ वै. का. ग. प. व रा. ज. का. नि., पृ. ६६ ]

## 'भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षण'

[लेखन : इ. स. १९१८, प्रकाशन : इ स. १९२९]

वसिष्ठानें शीघ्रफलप्रमेयाचा सिद्धान्त सांगून भारतांतल्याच नव्हे, तर जगांतल्याहि ज्योतिःशास्त्राचा पाया घातला. त्यानंतरच्या अग्निपुराणांत देखील चंद्रसूर्यस्पष्टीकरण सांगणाऱ्या वसिष्ठसिद्धान्ताचा उल्लेख आढळतो. ग्रीकांच्या ज्योतिःशास्त्राला इजिप्तमध्यें त्यावेळीं नुकती कुठें सुरुवात झाली होती. असें असूनहि, भारतीयांनी आपलें ज्योतिःशास्त्र इतरांकडून उसनें घेतलें असा अनेक पाश्चात्य ग्रंथकारांनी त्यांच्यावर आरोप केला होता. या आरोपाचें निरसन करण्याकरिताच मुख्यतः, त्या वेळचे अग्रगण्य ज्योतिर्विद् कै. शं. बा. दीक्षित यांनी 'भारतीय ज्योतिःशास्त्र' नांवाचा इतिहासात्मक बृहद्ग्रंथ इ. स. १८९६ मध्यें प्रसिद्ध केला. दीक्षितांनी हा ग्रंथ अत्यंत परिश्रमपूर्वक व उपलब्ध असलेल्या सर्व साधनांच्या साह्यानें लिहिला आहे.








अशा अवाढव्य ग्रंथांत अनेक उणीवा व चुका राहणें अपरिहार्य होतें व त्यांचें स्पष्ट आविष्करण होणेंहि जरूर होतें. तेंच कार्य भाऊजींच्या प्रस्तुत प्रबंधानें केलें आहे.

ग्रहांच्या वास्तविक गति ठरविण्याकरितां भारतीय ज्योतिःशास्त्राचें कै. दीक्षितांनी केलें त्यापेक्षां अधिक सूक्ष्म निरीक्षण करणें अवश्य होतें. भारतीय ज्योतिषाचा संबंध वायुपुराणादि धर्मग्रंथांशी व वेदांग ज्योतिषाशी म्हणजे वेदांशी पोंचत असल्यामुळें प्राचीन भारतीय धर्मशास्त्राचें सूक्ष्म ज्ञान असणेंहि अवश्य होतें. शिवाय, भारतीयांनी ज्योतिःशास्त्र ग्रीकांपासून घेतलें की काय या प्रश्नाचा समाधानकारक निर्णय करण्यासाठीहि जुन्या सिद्धान्तांचें निरीक्षण फारच सूक्ष्मपणानें करणें जरूर होतें.

प्रस्तुत प्रबंध लिहावयाला आणखीहि एक कारण घडलें. तें असें– १९०५ च्या मुंबई येथील सर्व भारतीय ज्योतिषपरिषदेनें 'करणग्रंथ' करणारास १००० रुपयांचें बक्षीस लावलें होतें. भाऊजींच्या मनांत आपण हा ग्रंथ करावा असें आलें. पण 'वर्षमान सूर्यसिद्धान्ताचेंच घ्यावें' हा त्या परिषदेनें घातलेला निर्बंध ग्राह्य की आग्राह्य हें त्यांना ठरवावयाचें होतें. त्याकरितां घ्यावयाचीं ग्रहगतीचीं मानें भारतीय ग्रंथांतून घ्यावीं कीं पाश्चात्य ग्रंथांतून घ्यावी असा त्यांना प्रश्न पडला. पाश्चात्य ग्रंथांतलीं मानें घेतल्यास प्राचीन भारतीयांनी अत्यंत परिश्रमपूर्वक केलेल्या शोधांचा त्याग करावा लागेल व भारतीय ग्रंथांतून घेतल्यास पाश्चात्यांनी लावलेल्या शोधांचा फायदा घेतां येणार नाही. अशा वेळीं 'या दोघांच्याहि मानांचा समन्वय करता येणार नाहीं का?' असा विचार भाऊजींच्या मनांत आला; आणि त्याचेंच फळ म्हणजे प्रस्तुत प्रबंध होय.

प्रस्तुत प्रबंधांत, प्राचीन भारतीय ज्योतिषी वेध किती सूक्ष्म घेत, पण अनुमानें कशीं चुकीचीं काढत हें भाऊजींनी फार सुंदर रीतीनें दाखविलें आहे. 'यस्मिन् वृत्ते भ्रमति खचरो नास्य मध्यः कुमध्ये' म्हणजे 'ग्रह वर्तुळांत वर्तुळमध्याभोवतीं मध्यमगतीनें फिरतो पण पाहणारा त्या वर्तुळाच्या मध्यांत नसतो' हा भारतीयांचा ग्रहगतिसिद्धान्त कसा चुकीचा आहे व तरीहि त्यांचीं परममंदफळें व उच्चें वास्तविकाशी कां, कितपत व कोणत्या परिस्थितींत जुळतात हें भाऊजींनी अत्यंत सूक्ष्मपणानें व मार्मिकपणानें यांत उलगडून दाखविलें आहे. या ग्रंथाच्या उत्तरार्धांत 'मूळवसिष्ठ-सिद्धान्त,' 'अग्निपुराणोक्त सिद्धान्त,' 'रोमक-सिद्धान्त' इत्यादि सिद्धान्तांचा व लल्लादि ज्योतिर्गणितज्ञांचा कालनिर्णयहि भाऊजींनी केला आहे.

प्रस्तुत प्रबंधाला कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी, कुठल्याहि ग्रंथाला प्रस्तावना लिहावयाची नाहीं असा निश्चय केल्यावर व डोळ्यांना अंधत्व आल्यावरहि, अत्यंत विद्वत्तापूर्ण प्रस्तावना लिहिली आहे. आपल्या प्रस्तावनेच्या शेवटी कोल्हटकर म्हणतात–

"प्रस्तुत निबंध प्रथम इंग्रजींत प्रसिद्ध झाला असता तर त्याचें योग्य चीज झालें असतें. तो मराठींत प्रसिद्ध झाल्यानें त्याचें तसें चीज झालें नाहीं. तरी त्यानें **मराठी वाङ्मयांत एका असामान्य पुस्तकाची भर पडून त्या वाङ्मयाचें महत्त्व निःसंशय वाढणार आहे, असेंच प्रत्येक मार्मिक वाचकास वाटेल"** —

लो. टिळकांनी प्रस्तुत प्रबंध तात्यासाहेब कोल्हटकरांकडून मुद्दाम मागवून वाचला होता. तो वाचून लो. टिळक इतके हर्षविस्मित झाले की, १९२० सालीं सांगली येथें कोल्हटकरांच्या अध्यक्षतेखाली भरलेल्या ज्योतिषसंमेलनांत, ज्यावरून शुद्ध पंचांगाचे गणित थोड्या श्रमांत सूक्ष्मपणानें करतां येईल असा करणग्रंथ तयार करण्याचा ठराव झाला, व जेव्हां त्या वेळचे अग्रगण्य ज्योतिर्विद् कै. व्यं. बा. केतकर यांनी रैवतपक्षाच्या मतानुसार नवा करणग्रंथ लिहून देण्याचे नाकारलें, तेव्हां लोकमान्यांनी भाऊजींना १९-६-१९२० रोजी तारेनें पुण्यास बोलावून करणग्रंथरचनेची बिकट कामगिरी त्यांचेवर सोपविली व त्याकरितां ठरलेलें १००० रु. चें बक्षीसहि पंचांगप्रवर्तन कमेटीनें त्यांना दिलें.

पण, १९१८ मध्यें लिहून तयार असलेला प्रस्तुत प्रबंध प्रसिद्ध होण्याचा योग मात्र टिळकांच्या मृत्यूनंतर नऊ वर्षांनी आला. नागपूर ॲकेडमीनें प्रस्तुत ग्रंथाला १५० रुपयांचें पारितोषिक देऊन त्याचा गौरव केला होता.

'करणकल्पलता'

[लेखन : इ. स. १९२०, प्रकाशन : इ. स. १९२५]

लो. टिळकांच्या मनांत शुद्ध पंचांग प्रचलित करण्याविषयीं फार कळकळ होती; व त्याकरितां मंडालेहून परत आल्यावर त्यांनी पुण्याला एक व सांगलीला एक अशीं दोन ज्योतिषसंमेलनें भरविलीं. सांगलीच्या संमेलनांत ज्यावरून शुद्ध पंचांगाचें गणित थोड्या श्रमांत सूक्ष्मपणानें करता येईल असा 'करणग्रंथ' तयार करविण्याचें ठरलें व त्याप्रमाणें ता. १५-६-१९२० च्या 'केसरींत 'करणग्रंथ असा असावा की त्यावरून पंचांगाचें सर्व गणित सुलभ व्हावें व त्याप्रमाणें वर्तविलेली ग्रहस्थिति दृक्‌तुल्य असून सायनपद्धतीची असावी' अशी जाहिरातहि दिली गेली. अशा प्रकारचा ग्रंथ तयार करून देणारास १००० रुपयांचें बक्षीसहि होतें. ता. १९-६-२० ला रात्रीं लो. टिळकांची तार आल्यामुळें करणग्रंथासंबंधी वाटाघाट करण्यासाठी भाऊजी पुण्याला गेले व लो. टिळक, प्रो. वि. ब. नाईक इत्यादिकांशी विचारविनिमय करून त्यांनी हा ग्रंथ तयार करण्याचें काम स्वीकारलें.

'भारतीय ज्योतिःशास्त्रनिरीक्षणां'त भारतीय व पाश्चात्य ज्योतिःशास्त्रांतील सिद्धान्तांचा भाऊजींनी जो समन्वय केला, त्याप्रमाणें शुद्ध पंचांगाचें गणित करण्याच्या नव्या रीती, दोन तीन कोष्टकगणकांच्या व अनेक कोष्टकांच्या साह्यानें भाऊजींनी ह्यांत शोधून काढल्या आहेत. सूर्यग्रहणगणितांत परमग्रास व परमग्रासकाळ काढण्याची फार सूक्ष्म रीति ह्यांत दिली असून महापाताचें गणितहि दोर्ज्यागुणांक-कोष्टकाच्या साह्यानें यांत फार सूक्ष्म केलें आहे. ह्या रीतीवरून येणारे ग्रह व नाटिकल अल्मॅनॅकचे ग्रह यांत १-२ कलांपेक्षा जास्त अंतर नाहीं. मानांचें सूक्ष्मत्व, शक्य तितकें संस्काराचें बाहुल्य आणि रीतीचें सूक्ष्मत्व यांमुळें हा ग्रंथ इतर कोणत्याहि जुन्या किंवा नव्या करणग्रंथापेक्षां जास्त सूक्ष्म झाला आहे. ह्या ग्रंथांतील पंचतारांधिकारांत मंदकर्णलब्धि फार सूक्ष्म असून तिचें गणितहि फार सोपें आहे.

'करणकल्पलता'च्या पूर्वार्धांत पंचांगास आवश्यक तितकें सर्व गणित असून उत्तरार्धांत छायागणित, सकलभूमंडलासंबंधी सूर्यग्रहणाचें गणित, स्पष्ट ग्रहावरून मध्यम ग्रह व त्याचा काळ काढण्याचें गणित, वेधांवरून मंदोच्चादि काढण्याचें गणित, मंदकर्णाशिवाय सूक्ष्म ग्रहस्पष्टीकरण इ० प्रकरणें आहेत.

लोकमान्यांनी लिहवून घेतलेल्या पण लोकमान्यांच्या मृत्युनंतर पांच वर्षांनीं, १० जानेवारी १९२५ रोजी, प्रसिद्ध झालेल्या प्रस्तुत ग्रंथानेच भाऊजींना ज्योतिर्गणिताच्या क्षेत्रांत भारतीय कीर्ति मिळण्याचा योग आला.

'करणकल्पलता' (उत्तरार्ध)

[लेखन : इ. स. १९२५; अप्रकाशित]

'करणकल्पलता'च्या या अप्रकाशित उत्तरार्धांत उच्च प्रकारच्या ज्योतिर्गणिताचें भाऊजींनी विवेचन केलें आहे. छायागणित, चंद्रशृंगोन्नति, बुधशुक्रकृतसूर्याक्रमण इत्यादि विषयांचा यांत विचार असून सकलभूमंडलासंबंधी सूर्यग्रहणाचें गणित, स्पष्ट ग्रहावरून मध्यमग्रह व त्याचा काळ काढण्याचें गणित, वेधांवरून मंदोच्चादि काढण्याचें गणित, मंदकर्णाशिवाय सूक्ष्मग्रहस्पष्टीकरण इत्यादि प्रकरणें यांत आहेत. या हस्तलिखितावर थोडे संस्कार करून तें प्रसिद्ध करणें अवश्य आहे.

'पंचांगचंद्रिका'

[प्रकाशन : इ. स. १९३१]

नागपूर येथील शास्त्रीय ग्रंथमालेचे अध्यक्ष कै. गोपाळ केशव गर्दे यांनी हा ग्रंथ भाऊजींकडून मुद्दाम लिहवून घेतला.

"तिथिचिंतामणींतील गणितापेक्षां ह्या ग्रंथांतील तिथि, नक्षत्रें व योगांचें गणित अनभ्यस्तास थोडसें कठीण वाटेल हें खरें; तथापि ह्या ग्रंथांत जितकी सूक्ष्मता साधली आहे तिच्या दृष्टीनें तें फारच सोपें आहे..." असे उद्गार भाऊजींनी 'करणकल्पलता'च्या प्रस्तावनेंत काढले आहेत. (पृ. ९). तरीहि, 'करणकल्पलते'-तील पंचांगगणित बरेंच श्रमदायक असल्यामुळें तीवरून पंचांगाचें गणित करण्याचा गणकास कंटाळाच येत असे, व त्यामुळें शुद्ध पंचांगाच्या प्रसारास अडचण येत होती. ती दूर करून तिथिनक्षत्रयोगांच्या गणितांत सोपेपणा आणण्याकरिता भाऊजींनी प्रस्तुत प्रबंध लिहून तो इ. स. १९३१ मध्यें प्रसिद्ध केला.

ह्या ग्रंथांत भाऊजींनी एक नवीनच समीकरण तयार केलें. (पृ. २१). त्यामुळें केरोपंतांच्या पंचांग-











साधन कोष्टकापेक्षा किंवा ज्योतिर्विद् केतकरांच्या वैजयंतीपेक्षा देखील ह्यांत अधिक सूक्ष्मता आली आहे. प्रस्तुत ग्रंथांत गणेशदैवज्ञाच्या तिथिचिंतामणीप्रमाणें अनेक कोष्टकांचा अवलंब केला असून त्यामुळें स्पष्ट चंद्रसूर्य काढल्याशिवाय एकदम स्पष्ट तिथ्यंतकाळहि अत्यंत सूक्ष्मतेनें काढता येतो.

'गणेशदैवज्ञांना चंद्राचा फक्त एकच (मंदफल) संस्कार माहित होता. त्यामुळें त्यांना गणित फार सोपें करतां आलें. तथापि त्यानें फक्त पौर्णिमा व अमावास्या हा दोनच तिथि आकाशांतील स्थितीशी जुळतात; म्हणून आज माहित झालेले चंद्राचे बहुतेक सर्व संस्कार चंद्रास देऊन त्यावरूनच पंचांगगणित केलें पाहिजे, आणि असें केल्यास पंचांगगणित तिथिचिंतामणींतील गणिताइतकें सोपें होणें अशक्य आहे. आणि म्हणूनच ह्या ग्रंथांत सूक्ष्मतेस न सोडता, गणित शक्य तितकें सोपें करण्याचा प्रयत्न केला आहे.' 'उपसंहारां'त भाऊजी पुढे म्हणतात–

"गुरुवर्य आपटे (उज्जयिनी) ह्यांचा 'पंचांगचिंतामणि' लवकरच प्रसिद्ध होणार आहे. त्यांतील गणित जर सूक्ष्म असूनहि जास्त सोपें असेल तर गणकांनी त्याचाच स्वीकार करावा; नाहीतर 'पंचांगचंद्रिके'चाच स्वीकार करावा."

'*The Astronomical Method and its Application to the Chronology of Ancient India*' [प्रकाशन : नागपूर विद्यापीठ, इ. स. १९४२]

प्रस्तुत ग्रंथ म्हणजे भाऊजींनी नागपूर विद्यापीठांतील किनखेडे व्याख्यानमालेंत दि. १३ ते १६ नोव्हेंबर १९४० रोजीं दिलेलीं व्याख्यानें होत.

प्रस्तुत ग्रंथांतील 'कंसवधकालनिर्णय' हा निबंध फार महत्त्वाचा आहे. 'हरिवंशां'त –

सूर्य– ४९° ते ६१°
भौम– १७७° ते १९१°
शुक्र– ४०° ते ५३° सुमारे
बुध– ६२° ते ८८°

ही कंसवधाच्या वेळची ग्रहस्थिति असंदिग्ध शब्दांत सांगितलेली असून त्यांत क्वचित् दिसणाऱ्या खग्रास सूर्यग्रहणाचाहि स्पष्ट निर्देश आहे. अशी ग्रहस्थिति शकापूर्वी १३१५ व २५६२ या वर्षी संभवनीय होती. या दोनहि वर्षांच्या खग्रास सूर्यग्रहणाचें गणित करून भाऊजींनी श. पू. १३१५ हें कंसवधाचें वर्ष निश्चित ठरविलें. कंसवध हा भारतीययुद्धाच्या ४० वर्षे आधी, म्हणजे शकपूर्व १३१५ या काळीं झाला हें भाऊजींनी यांत सप्रमाण सिद्ध केलें आहे.

प्रस्तुत प्रबंधानें भारतीयांच्या अत्यंत प्राचीन म्हणजे मौर्यपूर्व इतिहासाच्या ज्ञानांतहि मोलाची भर घातली आहे. वराहकल्पाच्या आरंभी (इ. स. पू. ३१०२) आनंद नावांच्या ऋषीनें ब्रह्मदेव हें नांव धारण करून ब्रह्मर्षि देशांत राज्य स्थापन केलें. त्याची भरभराट होऊन वैवस्वत मनूच्या काळांत तेथीलच लोक कुरुक्षेत्र अयोध्या, प्रयाग, बिहार वगैरे देशांत जाऊन राज्यें स्थापू लागले. त्या राज्यांच्या भरभराटीबरोबर ब्रह्मर्षि देशाचें महत्त्व कमी होणें अपरिहार्य होतें. तो पुढे मगध साम्राज्यांत विलीन झाला. ब्रह्मर्षि देशांतील अधिकाऱ्यांनाच ब्रह्मा, इंद्र, वायु, अग्नि, यम वगैरे नांवें होतीं. 'वायुपुराणांत देवदानवांच्या युद्धांचें जें वर्णन आहे तें खरोखर या देशाच्या दोन पक्षांतील युद्धांचेंच वर्णन होय...' हीं युद्धें शकपूर्व १६९० पासून ४० वर्षेपर्यंत – दैत्यांचा पूर्ण मोड होईपर्यंत – होत होतीं. प्राचीन आर्यांच्या ह्या इतिहासांतच, दर चवथ्या वर्षांनी अश्वमेध यज्ञांत देवांची स्तुति करण्याकरिता नवीन वेदमंत्र केले जात व ते सप्तर्षींच्या संमतीनें उपयोगांत आणले जात असेंहि भाऊजींनी दाखवून दिलें आहे.

भाऊजींच्या या व्याख्यानांतील क्रांतिकारक विचारसरणीवर व तर्कशुद्ध विवेचनशैलीवर लुब्ध होऊन नागपूर विद्यापीठानें त्यांना खास सुवर्णपदक दिलें.

## 'श्रीरामाच्या वनवासाची रोजनिशी'

श्रीरामाच्या वनवासाच्या रोजनिशीसंबंधी विद्वानांत अनेक वाद–विवाद आहेत. रोजनिशीशीं प्रत्यक्ष संबंध नसलेल्या, 'पंचवटी गोदावरीच्या मुखाजवळ की उगमाजवळ?,' 'लंकेचें स्थान कोणतें?' इत्यादि आनुषंगिक विषयांचाहि या वादविवादांत अंतर्भाव होतो. भाऊजींनी प्रस्तुत निबंधांत, रामायणांतील ग्रहस्थितीचा विचार करून, श्रीरामचंद्राच्या वनवासाची निःसंशय रोजनिशी अभ्यासकांपुढे ठेविली आहे.

' चैत्रः श्रीमानयं मासः पुण्यः पुष्पितकाननः ।
यौव राज्याय रामस्य सर्वमेवावकल्पताम् ॥ '
– अयोध्याकांड, स. ३, श्लो. ४

या, व अयोध्याकांड ४–२१,२२; २६–९ या वचनांवरून इ. स. पूर्व १५८४ म्हणजे शकपूर्व १६६२ चैत्र शुद्धांत गुरुवारीं, तेव्हांच्या गणितानें पुष्य नक्षत्रीं, श्रीरामास यौवराज्याभिषेक व्हावयाचा होता. आताच्या गणितानें द्वादशीस गुरुवार व पुष्याची अखेर येते; म्हणून, चैत्र शुद्ध द्वादशीस श्रीरामास अभिषेक व्हावयाचा होता असें दिसतें. पण, कैकेयीनें केलेल्या विघ्नामुळें तो रहित झाला. त्याच दिवशीं श्रीराम वनवासास निघाले. दुसऱ्या दिवशीं वनवासाला निघण्याची दशरथाची इच्छा त्यांनी मान्य केली नाही. [ ' अयोध्याकांड, ' सर्ग ३४ ]

वनवासारंभापासून पंचवटीतील पहिल्या हेमन्ता-पर्यंत म्हणजे मार्गशीर्षारंभापर्यंत १० संवत्सर म्हणजे १२४ चांद्रमास व मध्यंतरीं अधिक घेऊन आठ महिने व अठरा तिथी गेल्या, असें भाऊजी म्हणतात. म्हणजे १३२ चांद्रमास व १८ तिथी गेल्या.

इथपर्यंत श्रीरामाच्या वनवासाच्या रोजनिशीविषयीं बहुतेक वाद नाहीं. वाद रोजनिशीच्या पुढील भागा-विषयीं आहे व त्याच भागाचा भाऊजींनी सविस्तर विचार केला आहे.

ह्या हेमन्त ऋतूच्या पहिल्या पौर्णिमेस श्रीराम गोदावरीवर स्नानास गेले व स्नान करून परत आल्यावर शूर्पणखा राक्षसी रामाकडे आली [ सर्ग १६, श्लो. १४ ]. पौर्णिमेसच गोदावरीवर स्नानास जाण्याचें काय कारण असावें ? — ह्या पौर्णिमेस ग्रहण असावें हें एक कारण संभवतें. पण, ह्या सुमारास ग्रहण येत नाहीं असें भाऊजींनी गणित करून ठरविलें आहे—व कार्तिकी पौर्णिमेस त्रिपुरदाहाचा जसा उत्सव करतात, तशा प्रकारच्या उत्सवा निमित्त हें स्नान असावें, असें सांगितलें आहे.

ह्या पौर्णिमेच्या दुसऱ्याच दिवशीं शूर्पणखा श्रीरामा-कडे आली व तिचें नाक व कान कापले गेलें. तेव्हां ती जनस्थानांतील आपल्या भावाकडे-खराकडे-रडत गेली. खरानें श्रीरामावर १४ राक्षस पाठविलें. त्यांना श्रीरामानें मारलें. तेव्हां ती पुन्हा खराकडे गेली व तो चवदाहजार सैन्य घेऊन श्रीरामावर चालून आला. त्यावेळीं झालेलीं दुश्चिन्हें वाल्मिकीनें २३ व्या सर्गांत सांगितलीं आहेत; त्यांपैकीं एक सूर्य ग्रहण आहे.

श्रीराम वनवासास गेल्यानंतर तीन तिथि व साडे-पांच चांद्रमास इतक्या काळानें अयोध्येस फारच मोठें सूर्यग्रहण झालें. त्या वेळीं सूर्यबिंब ३१'।५४" असून ग्रास २४'।१०" होता. ह्या अयोध्येच्या सूर्यग्रहणाचा ' सूर्यश्चांतरधीयत ' [ अ. कां., ४१–९ ] ह्या वच-नांत वाल्मीकीनें निर्देश केला आहे. ह्या अयोध्येच्या सूर्यग्रहणानंतर १३५ चांद्रमासांनी म्हणजे वनवासा-रंभापासून तीन तिथि व १४०½ चांद्रमासांनी हिंदु-स्थानांत मोठें सूर्यग्रहण झालें. गोदावरीच्या काठावर हें सूर्यग्रहण बरेंच मोठें दिसलें. ह्या सूर्यग्रहणाच्या दिवशीं श्रीरामाचें खराशी युद्ध झालें. म्हणून, श्रीराम-खरयुद्ध वनवासारंभापासून तीन तिथि व १४०½ चांद्रमास इतक्या कालानंतर झालें, असें ठरतें.

पंचवटींत रावणानें केलेलें सीताहरण वनवासाच्या बाराव्या वर्षांच्या कार्तिकाच्या अंतीं झालें. त्यानंतर, जटायूची अंत्यक्रिया, सुग्रीवाशी सख्य, मारुतीकडून सीतेचा शोध, सैन्याची जमवाजमव इ. गोष्टी आटो-पून श्रीराम लंकेकडे चाल करून गेले.

ह्या सुमारास ग्रहस्थिति पुढीलप्रमाणें होती—

| | |
|---|---|
| मध्यम सूर्य २१६° | स्पष्ट सूर्य २१५° |
| मध्यम शुक्र ७३·७° | स्पष्ट शुक्र १७०·००° |
| मध्यम मंगळ २७१·३° | स्पष्ट मंगळ २४५·८° |
| मूळ नक्षत्र भोग २४३° | |
| मध्यम चंद्र १७८·५६° | नक्षत्र चित्रा |

श्रीरामानें लंकेस वेढा दिला त्या दिवशीं पौर्णिमा अर्थात् माघी पौर्णिमा होती. रावण रामावर चालून आला तो दिवस आमावास्येचा होता— व त्या दिवशी संध्याकाळीं ग्रह पुढीलप्रमाणें होते—

मध्यम सूर्य ३३·२° स्पष्ट सूर्य ३४° नक्षत्र कृत्तिका
मध्यम मंगळ ५·८° स्पष्ट मंगळ २३·४° नक्षत्र भरणी
मध्यम शुक्र १·७५° स्पष्ट शुक्र २०·३५° नक्षत्र भरणी
मध्यम बुध ७७·१४° स्पष्ट बुध ४६·७° नक्षत्र रोहिणी

वरील ग्रहस्थिति रामायणांतील वचनांशी नेटकी जुळते. ह्यावरून, रामरावणयुद्ध वैशाखाच्या अमावा-स्येस सुरूं झालें, हें उघड आहे.












अमावास्येस सुरू झालेलें हें रामरावणयुद्ध सात दिवस चाललें व रावण ज्येष्ठ शुद्ध सप्तमीस मारला गेला. रावण चवदाव्या वर्षाच्या ज्येष्ठांत मारला गेला व श्रीराम चवदावें वर्ष संपल्यानंतर अयोध्येस पोचले. श्रीराम विमानांत बसून लंकेहून अयोध्येला गेले व या प्रवासाकरिता त्यांना फक्त तीनच दिवस लागले असें कांही संशोधक मानतात. पण, तें चुकीचें आहे. रामाला लंकेहून अयोध्येस परत जाण्यास तीन दिवस लागले असें रामायणांत कुठेच सांगितलेलें नाहीं. रामायणांतील विमान आताच्या विमानाप्रमाणें नसून केवळ सुंदर व सोयीस्कर असें 'यान' होतें. पांढरे शुभ्र व वायुवेगाचे अश्व जोडलेला तो सुंदर व प्रशस्त रथ असावा. रामाला लंकेहून अयोध्येस परत जाण्यास सुमारे दहा महिने लागले.

श्रीराम चैत्रांत द्वादशीला वनवासास गेले. त्यानंतर १८ तिथींनी चैत्र पूर्ण झाला. तेथून १७३ चांद्रमासांनी चौदा वर्षें भरलीं. त्यांपैकीं पाच चांद्रमास अधिक म्हणून घेण्यांत आले असले पाहिजेत. बाकी १६८ चांद्रमास राहतात. चैत्रान्तापासून १६८ चांद्रमासांनी चैत्रच येईल. म्हणून चौदा वर्षें तेव्हाच्या गणितानें येणाऱ्या चैत्राच्या अन्तीं संपलीं. तेथून पांचव्या दिवशीं श्रीराम भरद्वाजाश्रमीं येऊन राहिले. सहाव्या दिवशीं ते गुहाच्या पुरांत गुहास भेटले. तेथून अयोध्येस जाण्यास दोन दिवस लागले. असें मानल्यास आठव्या दिवशीं म्हणजे शुद्ध अष्टमीस पुष्य नक्षत्रीं ते भरतास भेटले. शुद्ध अष्टमीस पुष्य नक्षत्र वैशाखांत येतें, ह्यावरूनहि चैत्राच्या अन्तींच चवदा वर्षें भरलीं व वैशाख शुद्ध अष्टमीस श्रीराम अयोध्येस परत आले, असें ठरतें.

एकूण, वनवासाच्या निमित्तानें श्रीराम अयोध्येबाहेर ५१३६ दिवस होते, हा सिद्धान्त निःसंशय सिद्ध होतो.

---

प्रॉ. ग. प्र. प्रधान

# ग्रामीण साहित्याचीं कांहीं वैशिष्ट्यें

( पुणें येथें इंडिअन कमिटी फॉर कल्चरल फ्रीडम् तर्फे 'ग्रामीण साहित्य' या विषयावरील परिसंवादांत वाचलेला निबंध ).

ग्रामीण साहित्याचा विचार करतांना तें केवळ ग्रामीण असल्यामुळें अधिक महत्त्वाचें आहे असें गृहीत धरणें बरोबर नाहीं. सर्व ललित साहित्याला जे निकष लावले जातात त्या निकषांवरच ग्रामीण साहित्याचें मूल्यमापन केलें पाहिजे. जीवनाचें वास्तव आणि कलात्मक चित्रण, कलावंताची कलाकृतीच्या विषयाशी झालेली एकात्मता, आणि तरीहि कलाकृति निर्माण करतांना आवश्यक असणारी त्याच्या वृत्तीची तटस्थता, शैलीची विषयाशीं असलेली अनुरूपता आणि कलावंताला अभिप्रेत असणारा परिणाम साधण्याचें शब्दांचें सामर्थ्य, कलाकृतीचे विविध घटक असूनहि वाचकाच्या मनावर होणारा एकसंध परिणाम–या सर्व अपेक्षा ठेवूनच ग्रामीण साहित्याचा रसास्वाद घेतला पाहिजे. हें सर्व मान्य केल्यानंतर ग्रामीण साहित्याचीं आणखी कांहीं वैशिष्ट्यें आहेत कां याचा विचार करणें आवश्यक आहे.

येथें विवेचनाच्या सोयीसाठी प्रथम ग्रामीण साहित्य असा व्यापक शब्दप्रयोग करण्याऐवजीं त्या साहित्याचें एक वैशिष्ट्य सुचविणारा प्रादेशिक साहित्य हा शब्दप्रयोग मी करूं इच्छितों. माणसाच्या कांहीं प्रेरणा व भावना स्थलकालातीत असल्या तरी विशिष्ट प्रदेशामुळें त्याच्या जीवनाला एक वेगळाच घाट येतो. यंत्रयुगापूर्वी सागराच्या परिसरांत राहणारा कोळी समाज दैववादी असावा, व मृत्यूच्या छायेंत जीवन जात असल्यामुळें त्या समाजांतील व्यक्तींच्या मृत्यूचा अपरिहार्य म्हणून स्वीकार करण्याची वृत्ति असावी, हें त्या समाजाचें चित्रण करणाऱ्या साहित्यांत स्पष्टपणें व्यक्त झालें आणि स्वाभाविकपणेंच या वैशिष्ट्यानें वाचकांना त्या साहित्याचें एक वेगळेंच आकर्षण वाटलें. सुपीक जमिनींत भरपूर पीक काढणारा रंगेल शेतकरी, दुर्जल शेती करतांना निसर्गाच्या अवकृपेचे तडाखे खाणारा शेतकरी, आंबे, नारळी, पोफळींच्या रम्य सहवासांत वाढणारा आणि कष्टाची भातशेती करणारा शेतकरी–या प्रत्येकाच्या जीवनाचें रूप इतरांपेक्षा वेगळें आहे, आणि हें स्वरूप शहरांत राहणाऱ्या वाचकाला जवळ जवळ अपरिचित असल्यामुळें त्याला हें विशेषच विलोभनीय वाटणें स्वाभाविक आहे. पण केवळ नाविन्यामुळें या जीवनाचें वर्णन करणारें साहित्य वाचकांना प्रिय वाटतें हें म्हणणें बरोबर नाहीं. सर्वसामान्य जीवनांतील सुपरिचित– भावनांनाहि विशिष्ट प्रदेशाच्या पार्श्वभूमीवर जें आगळें स्वरूप प्राप्त होतें त्यामुळें वाचक या साहित्याकडे आकृष्ट होतात. मुलाचा मृत्यू ही मातेच्या जीवनांतील अत्यंत दुर्दैवी घटना आहे व या आघातानें स्त्री ही वेलीसारखी उन्मळून पडते हें आपण नेहमी पाहतों. परंतु सिंग या आयरिश नाटककारानें लिहिलेल्या Riders to the Sea या एकांकिकेंत आपल्याला मातेच्या मनाचें एक वेगळेंच दर्शन घडतें. या एकांकिकेंतील वृद्ध स्त्रीला, तिच्या धाकट्या मुलानें खवळलेल्या सागरांत नौका ढकलण्याचें ठरविल्यावर, मृत्यूची चाहूल लागते. तिचे थोरले तिघे मुलगे समुद्रांतच बुडालेले असतात. ती धाकट्या मुलाला न जाण्यासाठी परोपरीनें विनविते; पण ही विनवणी करतांनाहि तो ऐकणार नाहीं हें तिला माहित असतें. नंतर तो मुलगा बुडाल्याचें जेव्हा तिला समजते तेव्हां ती दुःखानें विव्हल होते, परंतु कोळ्यांना सागराच्या तळाशींच चिरनिद्रा लाभणार हें आयुष्यभर अनुभविलें असल्यामुळें ती या आपत्तीचा अपरिहार्य म्हणून स्वीकार करते. माणदेशी माणसांच्या जीवनाला दारिद्र्याची काजळी अशीच आली आहे आणि असें पिचलेलें कारुण्यपूर्ण जीवनहि हीं माणसें मोठ्या चिवटपणें जगत आहेत.

प्रदेशामुळें वृत्तींत वेगळेपणा निर्माण झाल्याचें प्रत्यक्ष उदाहरण मी एका गढवाली स्त्रीमध्यें पाहिलें.

हिमालयाला ओठंगून तिची झोपडी होती. आणि दुर्दैवानें कडा कोसळल्यामुळें तिचा नवरा मरण पावला होता. तिच्या दुःखाची ही कहाणी ऐकून मी सहानुभूति व्यक्त केल्यावर ती म्हणाली, "हां, पहाडकी इतराजी होती है, तो क्या कर सकते है ?" तिनें उच्चारलेल्या 'पहाडकी इतराजी' या शब्दावरून मला Philosophic resignation चा खरा अर्थ समजला.

ग्रामीण साहित्याचें महत्त्व वाचकाला वाटतें याचें आणखीहि एक कारण आहे. या साहित्यांत निसर्ग सतत वावरत असतो आणि त्यामुळें प्रत्येक साध्यासुध्या अनुभवाला ताजेपणा आणि टवटवीतपणा येतो. कांहीं लेखकांचें असें म्हणणें आहे कीं, अनुभव कोणता आहे यापेक्षां त्याच्या सूक्ष्म छटा लेखक कशा कलापूर्ण रीतीनें वर्णन करतो यावरच आपण साहित्याचें मूल्यमापन केलें पाहिजे. हें म्हणणें बऱ्याच अंशीं खरें असलें तरी आयुष्यांतील अनुभवांत प्रत असते. कांहीं भव्य तर कांहीं क्षुद्र, कांहीं उदात्त तर कांहीं सामान्य असे असतात व मनाला निसर्गतःच भव्यता व उदात्तता यांची ओढ वाटत असते. शहरांतल्या, विशेषतः यांत्रिक जीवन असलेल्या शहरांतल्या, बहुतेक गोष्टींना एक तऱ्हेचा शिळेपणा येतो. त्या गोष्टी रंगरूपहीन वाटतात. अशा शहरांतल्या 'त्रिन तोंडाच्या संध्याकाळचें' वर्णन ज्यावेळी एखादा प्रतिभाशाली लेखक करतो अगर अशा परिसरांतील 'मंजुळेचें' हृदयस्पर्शी व्यक्तिचित्र ज्यावेळी एखादा थोर लेखक रंगवितो, त्यावेळी कलाकृति म्हणून तें आपल्या मनाला विलोभनीय वाटतें हें खरें. पण असे अपवाद सोडले तर जो अनुभव शहरांत अगदीं कळाहीन होतो तशाच तऱ्हेचा अनुभव ग्रामीण जीवनांत रसरशीत वाटतो. तसें पाहिलें तर मुंबईला एखादा कारकून दमून आल्यावर चाळींतल्या खोलींत पाटावर बसून बायकोनें दिलेला चहा पितो आणि झाडाच्या आडोशाला बसून शेतकरी कारभारणीनें आणलेली कांदा भाकर खातो यांत फरक काय असा प्रश्न करतां येईल. परंतु पहिला अनुभव व दुसरा अनुभव यांत फरक आहे. ग्रामीण जीवनांत अधिक मोकळेपणा आहे, अधिक रसरशीतपणा आहे हें मान्य करावें लागेल. चाळींतल्या नळावर पाणी भरतांना बायकांच्यांत चालणारीं बोलणीं आणि खेड्यांत पाणवठ्यावर सासुरवाशिणींचें चाललेलें हितगूज यांत बरखर फरक दिसला नाहीं तरी परिसर बदलल्यानें पाणवठ्यावरील हितगुजाला वेगळें सौंदर्य प्राप्त होतें. हें बहुतेकांना मान्य होईल. एखाद्या कॉलेजकन्येनें चतकोर हातरुमालानें पावडरला धक्का न लावतां घाम टिपणें आणि भात कांडतांना तरुण कांडपिणीनें पदराच्या शेवानें घाम पुसणें यांतील कोणतें अधिक सौंदर्यपूर्ण आहे हें सांगायला कां हवें ? छत्री अपुरी पडल्यामुळें भिजणें आणि श्रावणांतल्या सरींनीं ओलेचिंब होणें यांतील फरक अरसिकालाहि समजतो. खेड्यांतील अनुभवांतील भावनांत बहुतेक वेळां सूक्ष्मता कमी असते; त्यांत सर्वसामान्यपणें गुंतागुंत नसते. या उलट सुशिक्षित समाजांत जीवनाच्या जाणिवा वाढल्या असल्यामुळें त्यांच्या भावनांचें स्वरूप ढोबळ नसतें. हरबा शेतकरी बायकोवर रागावतो म्हणजे त्याचें माथें भडकतें, त्याला बायकोचा संताप येतो, तिला दोन मुस्कटांत माराव्याशा वाटतात, कांहीं वेळां तो त्या मारतोहि. याच्या उलट शहरांतील एखादा विद्याधर ज्यावेळी रागावतो त्यावेळी तो थोडासा स्वतःवर, बराचसा परिस्थितीवर आणि कांहींसा बायकोवर रागावलेला असतो. त्याला क्षणभर बायकोचें तोंड रंगवावेसें वाटतें, पण दुसऱ्याच क्षणीं आपल्या मनांत अशा रानटी भावनेची ऊर्मि आली यामुळें त्याला अपराधी वाटूं लागून त्याची स्वतःचींच कानशिलें लाल होतात. त्याचवेळीं हा दुबळेपणा आहे, आपल्याला जोरांत रागावतां येत नाहीं ही खंत वाटून तो स्वतःवर चिडतो आणि या सर्व भावकल्लोळांतून त्याच्या तोंडून रागाचे कांहीं शब्द निघतात. ही सूक्ष्मता कांहीं वेळां आकर्षक रीतीनें वर्णन करतां आली तरी एकूण अनुभवांतील उत्कटतेचा अभाव हा लपून राहत नाहीं. खेड्यांत एकूण जीवनाचा परिघ मर्यादित असल्यामुळें बऱ्याच गोष्टी उघड्या वाघड्या असतात. तेथील एकूण जीवनांत महत्त्वाचे क्षण कमी असल्यामुळें जे क्षण महत्त्वाचे असतात त्यांतील उत्कटता स्पष्टपणें जाणवते. या महत्त्वाच्या क्षणांत जे समरप्रसंग निर्माण होतात त्याचें स्वरूप elemental असते व त्यामुळेंच ते आपल्याला आकर्षक वाटतात.

ग्रामीण जीवनांत हे समरप्रसंग असले तरी त्यांचा आविष्कार नाटकाच्या माध्यमांतून करणें आपल्या समाजांत कठीण आहे; असें मराठींतील ग्रामीण साहित्याचा आढावा घेतला तर आढळून येतें. या साहित्यांत ग्रामीण जीवनाचें वैशिष्ट्य वर्णनांतून व्यक्त होत असतें व वर्णनाला नाटकांत स्थान नसतें. त्याचप्रमाणें आज जो नाटकाचा प्रेक्षकवर्ग आहे त्याला केवळ ग्रामीण भाषेंत लिहिलेलें नाटक कितपत आवडेल हाहि प्रश्न आहे. या दृष्टीनें कथा, कादंबरी व व्यक्तिचित्रें हे वाङ्मयप्रकार ग्रामीण जीवनाचे दर्शन घडविण्यास अधिक प्रभावी आहेत असें वाटतें. ग्रामीण जीवनांतील समरप्रसंग, केवळ नाट्यपूर्ण रीतीनें मांडण्यापेक्षां खास खेडेगांवीं गोष्टिवेल्हाळपणानें तो वर्णन केल्यास अधिक लज्जतदार वाटतो असा सर्वसाधारण वाचकांचा अभिप्राय आहे.

ग्रामीण साहित्यांतील विनोदाचेंहि एक खास वैशिष्ट्य असतें. त्या विनोदाचें स्वरूप बौद्धिक नसतें. हा विनोद बहुधा प्रसंगनिष्ठ व कांहीं वेळां व्यक्तिनिष्ठ असतो. इरसालपणा हें या विनोदाचें प्रमुख लक्षण असतें. हा विनोद मनमोकळेपणानें व व्रात्यपणानें केलेला असतो. यांत ' भावना दुखवायच्या नाहींत ' असल्या हळवेपणाला स्थान नसतें. एखाद्याची टर उडविल्याशिवाय हा विनोद रंगत नाहीं. विनोद हा सहानुभूतीवर आधारलेला असावा हा नागर जीवनांत मान्य होण्याचा संकेत ग्रामीण जीवनांत मानला जात नाहीं.

ग्रामीण साहित्याचें दुसरें वैशिष्ट्य भाषेंत असतें. आपल्या बोलण्यांत परिचित गोष्टींचा उल्लेख नेहमी येतो; आणि खेड्यांत राहणाऱ्या लोकांच्या बोलण्यांत याचमुळें निसर्गाचा उल्लेख सहजपणें येतो, व नकळत त्या भाषणाला काव्यमयता येते. खानदेशांत मी एका भिल्लाला विचारलें कीं, " नाच रात्री सुरू झाला कीं, किती वेळ चालतो ? " यावर तो चटकन उत्तरला ' सुख निगतव ' " म्हणजे शुक्राची चांदणी निघेपर्यंत, उगवेपर्यंत. एका रांगड्या राकट माणसाच्या तोंडचा तो काव्यमय उल्लेख ऐकून मी स्तिमित झालों.

ग्रामीण साहित्यांत भाषेला सतत हाच जिवंतपणा आलेला दिसतो. श्री. र. वा. दिघे यांच्या ' सराई ' आणि ' पड रे पाण्या ' या कादंबऱ्यांतील भाषेला अनेकदां जी विलक्षण काव्यमयता आलेली आहे ती निसर्गाच्या साह्यांतूनच निर्माण झालेली आहे. याच्या उलट आपणा शहरवासीयांच्या सभाषणांत जे उल्लेख येतात ते आपल्या यंत्राधिष्ठित जीवनांशीं संबद्ध असतात व त्या यंत्राचें महत्त्व मान्य असलें तरी, त्यांचें उल्लेख रुक्ष व गद्य वाटतात कोंबड्याचें आरवणें आणि रेडिओचा पहिला सिग्नल यांत फरक हा कीं, कोंबड्याच्या आरवण्याच्या नुसत्या उल्लेखानें आपलें मन तुरा वर करून चालूं लागतें; पण रेडिओचें प्रातः-संगीत सुस्वर असूनहि त्याच्या उल्लेखानें असें कांहीं होत नाहीं.

ग्रामीण साहित्याचें आकर्षण आपल्याला तें जीवन अपरिचित असल्यामुळेंच प्रामुख्यानें वाटतें हें कबूल केलें पाहिजे. खेड्यांतील वाचकांनी या जीवनांतील रूक्षपणा, भकासपणा हा इतका अनुभवलेला असतो कीं, त्यांना आपणाला प्रतीत होणारी काव्यमयता फारशी महत्त्वाची वा आकर्षक वाटत नाहीं. म्हणजे शहरांतील जीवनाचें चित्रण करणाऱ्या साहित्याचा वाचकवर्ग मर्यादित आहे व ग्रामीण साहित्यास खूप मोठा वाचकवर्ग मिळेल अशी अपेक्षा ठेवणें योग्य होणार नाहीं. मात्र या साहित्यांत साहित्यगुण मोठे असले, वाचकाला अस्वस्थ करण्याचें त्यांत सामर्थ्य असलें व मर्यादित परिसरांतील जीवनाचा बारिक तपशील दाखवितांना जीवनाच्या चिरंतन सत्याचें अभिनव दर्शन त्यांत घडत असलें व तें साहित्य ग्रामीण आहे हें वैशिष्ट्य मान्य अगर अमान्य असलें तरी वाचक मुग्ध झाल्याशिवाय राहणार नाहींत. बदलत्या परिस्थितींत जीवनांत जें भराभर परिवर्तन होत आहे व त्यामुळें खेड्यांतील लोकांच्या आकांक्षा वाढत आहेत आणि तेथील जीवनांत नवे ताण (Tensions) निर्माण होत आहेत, त्यांचें चित्रण अद्याप मराठींत झालेलें नाहीं हें मान्य करावें लागेल. या नव्या जाणिवा व त्यामुळें निर्माण होणारे समरप्रसंग यांच्या वास्तव दर्शनामुळें आपलें ग्रामीण साहित्य कितीतरी समृद्ध होऊं शकेल. मात्र या गोष्टी लेखकांना उत्कटतेनें जाणवल्या तरच हें चित्रण प्रभावी होईल. तसें न होतां केवळ रुचिपालट म्हणून एखाद्या लेखकानें असें लिहिलें तर त्या साहित्यांत जिवंतपणा येणार नाहीं. ग्रामीण साहित्यासंबंधींच्या

चार अपेक्षा व्यक्त करून हें विवेचन संपवितो. विदर्भ, मराठवाडा व पश्चिम महाराष्ट्र येथील अनेक वैशिष्ट्यपूर्ण भागांचें जीवन मराठी साहित्यांत अद्याप आलेलें नाहीं. या सर्व ग्रामीण प्रदेशांतील विविधता मराठी साहित्यांत वर्णिली जावी व त्यामुळें महाराष्ट्राच्या बहुरंगी, बहुढंगी जीवनाचें दर्शन घडावें ही पहिली अपेक्षा आहे. केवळ वर्णनापेक्षांहि या परिसराच्या पार्श्वभूमीवर जीवनाचें नाट्य अधिक खुलून दिसावें अशा तऱ्हेनें या परिसराचा व जीवनाचा जिव्हाळ्याचा संबंध दाखविणारें साहित्य अधिकाधिक लिहिलें जावें ही दुसरी अपेक्षा. महाराष्ट्रांतील नद्यांना, डोंगरांना शेतांना आणि माळरानांनाहि व्यक्तिमत्त्व आहे. आमच्या प्रतिभाशाली लेखकांनी आपल्या कथा-कादंबऱ्यांतून अनेक व्यक्ति रेखाटतांना या नद्यांचीं, गांवांचीं, शेतांचीं व्यक्तिचित्रें रेखाटलीं आहेत. आपलें जीवन घडविणाऱ्या निसर्गांतील या लहरी स्वच्छंदी व्यक्तींचें बहारीचें दर्शन घडावें ही तिसरी अपेक्षा. आमच्या मराठी भाषेंत सामर्थ्य असलें तरी ती बरीचशी रुक्ष आहे. पण महाराष्ट्राच्या कानाकोपऱ्यांतील लोकांच्या संभाषणांत मात्र अनेक काव्यमय प्रतिमा व शब्दप्रयोग रूढ आहेत. इथला अवखळ पाऊस, लहरी नद्या, हंसरीं फुलें, निळेंभोर आकाश, स्वच्छंद निर्झर यांच्या सहवासांतून ही काव्यमयता टिकून राहिली आहे. या शब्दसंपत्तीनें आमची मायबोली अधिक संपन्न व्हावी व लालित्याची गहिरी छटा तिच्या तोंडावर खुलावी ही चौथी अपेक्षा व्यक्त करून हें माझें निवेदन पुरें करतो.

---










# बौद्धागमार्थसंग्रहः

पाली व संस्कृत ] [ मूल्य रु. २०

संपादक : डॉ. पी. एल्. वैद्य एम्. ए., डी. लिट्. ( पॅरिस )

अखिल भारतीय कीर्तीचे पंडित श्री. वैद्य यांनीं पाली व संस्कृत अशा समग्र बौद्ध साहित्याचें मंथन करून बुद्धचरित्रासंबंधीं व बुद्धाचे उपदेशपर संदर्भ यांत ग्रथित केले आहेत. या ग्रंथाच्या परिशीलनानें बौद्ध धर्माचें वा हीनयान व महायान या दोन्ही बौद्ध संप्रदायांचें सर्वांगीण दर्शन होईल. विद्वान व विद्यार्थी या दोघांना संग्राह्य असा हा संदर्भ ग्रंथ आहे. मूळ पाली व मूळ संस्कृत अशा बुद्धोक्तींचा हा संग्रह आहे.

याचा मराठी अनुवाद महाराष्ट्र राज्य, साहित्य व संस्कृति मंडळ लवकरच प्रसिद्ध करणार आहे.

बुद्धवंस, चरियापिटक, निदानकथा, ललितविस्तर, सुत्तनिपात, महावग्ग, चुल्लवग्ग, सुमंगलविलासिनी, महापरिनिब्बाण, समन्तपासादिका, दीघनिकाय, संयुत्तनिकाय, अंगुत्तरनिकाय, मज्झिमनिकाय, विसुद्धिमग्ग, बोधिचर्यावतार, मिलिन्दपञ्ह, थेरगाथा, थेरीगाथा, मध्यमकशास्त्र, शालिस्तंबसूत्र, समाधिराजसूत्र, लङ्कावतारसूत्र, सद्धर्मपुण्डरीक या ग्रंथांतील बुद्धचरित्र, भिक्षुभिक्षुणीशिक्षण, धर्म, प्रकीर्णक व संगीति अशा पांच विषयावरील संदर्भ यांत घेतले आहेत.

मिळण्याचें ठिकाण —

**प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई** ( सातारा )

श्री. श्री. रा. टिकेकर

# आकाशवाणी : पावशतकाची कामगिरी

" ऑल इंडिया रेडिओ " चा तिसावा वाढदिवस ता. २३ जुलै १९५७ रोजीं सर्व स्टेशनांवर मोठ्या डौलानें साजरा झाला ( वार्षिक रिपोर्ट १९५७–५८ पृ. ७. ) तरी ता. ८ जून १९६१ रोजीं रौप्य महोत्सव ( = २५ व्या वर्षाचा ) पुनः साजरा होतो, हें गौडबंगाल पुष्कळांना उकलत नाहीं. तिसाव्या वाढदिवसानंतर सुमारें चार वर्षांनीं २५ वा वर्धापनदिन हा क्रम जरा अव्यवहारी वाटतो खरा. पण सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास त्यांत तसा फरक आहे. तिसावा वाढदिवस झाला तो हिंदुस्थानांत रेडिओचे कार्यक्रम खाजगी कंपनी करीत होती–त्या प्रसंगाचा-रेडिओच्या सुरुवातीचा. पुढें हिंदुस्थानसरकारनें ही " कंपनी " जें काम करीत होती तें आपणांकडे घेतलें – आणि त्या खात्याचें नांव " ऑल इंडिया रेडिओ " असें ठेवलें तें ८ जून १९३६ पासून. आतां " आकाशवाणी " नांव स्वीकारलें त्या दिवसाची " सिल्व्हर ज्युबिली " करायची असल्यास आणखी अठरा-वीस वर्षे सहज लागतील. कारण म्हैसूर-( संस्थान ) च्या रेडिओचें नांव " आकाशवाणी " असें रूढ होतें. सर्व संस्थानें विलीन झाल्यानंतर रेडिओ केंद्रेंहि विलीन झालीं – त्यांत " आकाशवाणी "हि ऑल इंडिया रेडिओंत सामावली. पण तिचें नांव इतकें मोहक आणि सोपें आहे कीं अलिकडे ' ऑल इंडिया रेडिओ ' ला देशी भाषांतील पर्याय म्हणून " आकाशवाणी " हें नांव घ्यावेंसें वाटलें. म्हैसूरची ही देणगी आहे या गोष्टीचा " विसर न व्हावा ".

आज आकाशवाणी म्हणून म्हणतात त्या खात्याचा विस्तार २८ स्टेशनें ( केंद्रें ) ६५ ट्रान्समीटर्स ( = ध्वनिक्षेपक यंत्रें ) असा सांगतात. देशभरांत मिळून सुमारें २० लाख (परवानदार) रेडिओ आहेत ( सप्टें. १९६० अखेर ) हा आकडा रेडिओ-प्रसाराचा निदर्शक समजावा. देशभरच्या शाळांत मिळून १५७९१-रेडिओ आणि एकंदर ग्रामीण विभागांत मिळून ४६६४१ रेडिओ- हीहि फोड करतां येते. आणि " हा आमचा विक्रम " म्हणून सरकारी पत्रकांत बढाई मारलेली आढळते. ती बढाई जोरदार ठरावी म्हणून स्वराज्याच्या प्रारंभीं आमची काय अवस्था होतीं तीहि सांगतात.

केवळ ६ स्टेशनें, १० ट्रान्समीटर्स, २४८,००० परवानदार रेडिओ-असा हिशेब सांगून आमची केवढी मोठी प्रगति झाली पहा – असें भासविण्याचा प्रयत्न होतो. वास्तविक रेडिओसारखें खातें हें वाढलेंच पाहिजे– भरमसाट वाढलें पाहिजे हीच त्याच्या प्रगतीची खूण होय. स. १९४७ पासून बारा-तेरा वर्षांत प्रगति झाली ती अनिवार्य होती– आणि तिजसाठीं भारत सरकारच्या तिजोरींतील सुमारें तीस कोट रु. खर्च झाले आहेत– या गोष्टी लक्षांत घेतल्यावर त्या प्रगतीची बढाई थोडी फोल ठरते. शिवाय बडोदें, औरंगाबाद, हैदराबाद, म्हैसूर, त्रिवेंद्रम, हीं पांच संस्थानी व अलाहाबाद हें युनिव्हर्सिटीचें अशीं एकूण सहा केंद्रें ( तिथले सात आठ ट्रान्समीटर्स ) हे सामीलनाम्या-मुळें पदरांत पडले हा लाभ अचानक झालेला आहे. आणि पूर्वीं संस्थानी मुलुखांतल्या रेडिओ परवान्यांची गणना वेगळी होत असे– ती आतां सर्व परवान्यांत मिसळली आहे... या गोष्टी लक्षांत घेतल्यावरही बढाई बरीच फिकी पडते.

पोलिस खात्याचा व्याप कमी झाला तर ती शासन-संस्थेची प्रशंसा ठरेल. रेडिओचा व्याप भरमसाट वाढला तरच ती त्या खात्याची प्रशंसा ठरेल. लोक दररोज रेडिओ नव्यानें खरेदी करीत असले– आणि कायदा असल्यामुळें ठराविक फी भरीत असले तरी तेवढ्यानें ऑल इंडिया रेडिओची लोकप्रियता अजमावतां येत नाहीं. आकाशवाणीखेरीज इतर अनेक कार्यक्रम रेडिओवरून ऐकतां येतात आणि हे इतर कार्यक्रम ज्या मानानें अधिक लोकप्रिय, त्या मानानें









आमच्या ऑल इंडिया रेडिओची प्रतिष्ठा कमी, हें सूत्र लक्षांत घेणें आवश्यक आहे.

**आकाशवाणी केंद्रें आणि क्षेपक**

| | |
|---|---|
| अजमीर | १ |
| अलाहाबाद | १ |
| अहमदाबाद–बडोदें | २ |
| इंदूर | १ |
| कटक | १ |
| × कलकत्ता | ४ |
| कालिकत | १ |
| × गौहत्ती | ३ |
| जम्मू | १ |
| जयपूर | १ |
| जालंधर | १ |
| त्रिचनापल्ली | १ |
| त्रिचूर | १ |
| त्रिवेंद्रम् | १ |
| × दिल्ली | १६ |
| धारवाड | १ |
| नागपूर | १ |
| पाटणा | १ |
| पुणें | १ |
| बंगळूर | १ |
| ☐ भोपाळ | १ |
| × मद्रास | ४ |
| × मुंबई | ५ |
| ☐ रांची | १ |
| राजकोट | १ |
| × लखनौ | २ |
| विजयवाडा | १ |
| श्रीनगर | १ |
| ☐ सिमला | १ |
| × हैद्राबाद | २ |

× लघु लहरी व मध्यम लहरी.
☐ फक्त लघु लहरी

केंद्रांची संख्या, ट्रान्समिटरांची गणति अथवा परवान्यामुळें दरसाल होणारी आवक यांपैकीं कशानेंहि रेडिओची कर्तबगारी नीट व्यक्त होत नाहीं. रेडिओचे कार्यक्रम किती होतात–कसे होतात–आणि जनतेंतील किती जणांना त्यांत भाग घेतां येतो, यांचा साकल्येंकरून विचार झाला म्हणजे ती कर्तबगारी नीट लक्षांत येईल.

प्रत्येक केंद्राचीं साधारण तीन अधिवेशनें असतात. सकाळीं अडीच तीन तास; दुपारीं दोन अडीच तास आणि रात्रीचें ५-५॥ तास असे कार्यक्रम रोज-बारमहा चालू असतात. सुटीच्या दिवशीं अधिवेशनें लांबतात कमी होत नाहींत. दररोज सुमारें १०–११ तास रेडिओ चालू असतो. आठवड्याचे पाऊणशें तास होतात. हें चक्र अव्याहत चालू ठेवायचें म्हणजेच मोठी शहामत होय–कारण प्रत्येक कार्यक्रमाचा "कर्ता" निराळा असतो. प्रत्येक कार्यक्रम फार तर अर्ध्या तासाचा; फक्त रात्रीचें गाणें, नाटक, रूपक ..... हें थोडें लांबतें. असें विविध कार्यक्रम-

**जोड – केंद्रें**

लखनौ – अलाहाबाद
जयपूर – अजमेर
भोपाळ – इंदूर
अहमदाबाद – बडोदें
त्रिवेंद्रम् – कालीकत – त्रिचूर

या खेरीज विशिष्ट कार्यक्रमासाठीं

(१) मुंबई – पुणें – नागपूर
अहमदाबाद – बडोदें – राजकोट;
(२) बंगळूर – धारवाड;
(३) मद्रास – त्रिचनापल्ली;
(४) हैद्राबाद – विजयवाडा.

अशा अनेक 'सांखळ्या' सांधतात.

दर आठवड्याच्या संगीत कार्यक्रमासाठीं तीन मराठी, तीन गुजराती व कानडी (धारवाड) अशा सात केंद्रांची मालिका होते. मद्रासेकडेहि अशीच करतात.








" कर्ते " आधींपासून ठरवून ठेवायचे. त्यांच्या कार्यक्रमाची " चांचणी " घेऊन पहायची – ते वेळेवर आले नाहींत तर त्यांच्या " ऐवजीं " दुसरा कुणी " कर्ता " उभा करायचा. हीं तंत्रें कांहीं सोपी नाहींत. एकाद्या दिवशीं गांवांत अशी गाण्या-बजावण्याची बैठक करायची, कुणा शिष्टाचें भाषण ठरवायचें, मुला-मुलींचा मेळावा जमवायचा, बायकांचें संमेलन भरवायचें ... म्हणजे कोण यातायात पडते ! आणि किती दिवस आधींपासून तयारी करावी लागते. रेडिओचें पहावें तर ही यातायात रोज– सर्वच प्रकारच्या खट-पटींची. कारण गाणें नित्य असतें. कुणाचें तरी भाषणहि होतें– मुलांचा, बायकांचा, शालेय, मजुरांचा, ग्रामीण जनांचा असेहि कार्यक्रम नित्यक्रमापैकीं असतात. " रात्रंदिन आम्हां " युद्धाचा " प्रसंग " असें रेडिओ अधिकाऱ्यांनीं म्हटलें तर त्यांत मुळींच वावगें नाहीं.

### आकाशवाणीची टांकसाळ

**नवे शब्द**

| | |
|---|---|
| अमर संगीत | |
| भक्ति (सं) गीत | |
| नाट्य संगीत | |
| प्रसार गीत | प्रादेशिक संगीत |
| सुगम संगीत | साज संगीत |
| संगीत लहरी | संगीत शिक्षा |
| सुबद्ध संगीत | संगीत रूपक |
| नव-गान | संगीतिका |
| चित्र लोक | स्वरमंजरी |
| वाद्यवृंद | मंजुघोष |
| रागबद्ध गीत | रागरंजन |
| संगीत गोष्ठी | समूह गान |
| विचार गोष्ठी | स्वरमुद्रिका |
| संगीत सुषमा | ध्वनिमुद्रिका |
| किंन्नर संमेलन | गीत गुंजन |
| रंगवाणी | |
| वाद्य-गोष्ठी | |
| ताल-वाद्य-कचेरी | |
| रम्य गीति | |
| स्वर वेला | |

**यांतील आकाशवाणी अभिप्रेत अर्थ हुडकून काढावा : हें विचारशक्तीला खाद्य आहे.**

मानवी व्यवहाराचा तेवढा हा विचार झाला. यांत्रिक भानगडींकडे पाहिलेंच कुठें ? बिजली तर हात जोडून सदैव तयार हवी. शिवाय कार्यक्रम होतात त्या ठिकाणीं ( = स्टुडिओ ) ट्रान्समिटर बसविला असेल तिथें, आणि श्रोते ऐकणार त्या ठिकाणीं– बिजली तशीच सेवेसाठीं बिनतक्रार सज्ज पाहिजे. यांत कुठेंहि थोडा जरी बिघाड झाला तरी श्रोते तक्रार करतील.

भारतीय संस्कृतींत घड्याळाला स्थान नाहीं, म्हणून आम्हांला कित्येकजण हिणवितात. आमच्या वक्तशीरपणाला हा संभावित टोला आहे. पण तो राष्ट्रीय प्रमाणावर असल्यानें त्या गुणाबद्दल एवढीशी खंत बाळगण्याचें कारण नाहीं. रावसाहेब मंडलिक, त्यानंतर महात्मा गांधी, पंडित जवाहरलाल......अशा थोर पुरुषांची ख्याति घड्याळाबरहुकुम काम पार पाडण्या-बद्दल आहे. बहुजनांना तो वक्तशीरपणा–तें घड्याळ्याचें दास्य–अद्याप साधत नाहीं हें खरें. अशा मंडळींपैकीं वक्ते, गायक, वादक, नट, हुडकून काढून त्यांना मोजक्या सेकंदांत– हुकमी कार्यक्रम करायला लावावयाचें म्हणजे फार कठिण कार्य होय. तें रेडिओनें साधलें आहे. रोज अनेकांना वक्तशीरपणाचे धडे जबर-दस्तीनें मिळत आहेत.

गवय्यांच्या बाबतींत हें काल-बंधन फार महत्त्वाचें म्हटलें पाहिजे. पंधरावीस मिनिटें " सूर " जमवाय-लाच ज्यांचीं खर्चे व्हायचीं त्यांना पंधरा मिनि-टांत–अर्ध्या तासांत ठराविक राग गाऊन दाखविण्याची " सर्कस " करायला लावणें ही खरोखर फार मोठी बहाद्दुरी होय. रेडिओला म्हणूनच ती साधली. कुणाहि व्यक्तीला ती साधली नसती. लहरी गवय्यांचा कार्यक्रम, नादलहरी रूपानें जगभर पसरविण्यासाठीं वैयक्तिक लहरी गुंडाळून ठेवाव्या लागतात–याची प्रत्यक्ष जाणीव कलावंतांना झाली ही केवढी मोठी प्रगति होय.

गायक–वादक यांचें नियंत्रण जसें रेडिओनें साधलें तसेंच वक्त्यांचेंहि साधलें. भाषण आधीं लिहून आणा-

वयाचें – लिहिल्याबरहुकूम तें वाचावयाचें; हात वारे करायचे नाहींत; ओरडायचें नाहीं, उभें सुद्धां रहायचें नाहीं. – हीं सर्व बंधनें एक वेळ पत्करतील; पण एका बंद खोलींत, एकट्यानें व्याख्यान द्यायचें ही कल्पनाच आमच्या पंडितांना अनाकलनीय होती. किती तरी जणांना रेडिओनें "बोलके" केलें आहे – किती जणांना "विषयांतरापासून" परावृत्त केलें आहे. मुद्देसूदपणाचें शिक्षण देणारा रेडिओसारखा दुसरा कडक गुरु नाहीं.

नटांना सुद्धां नवे निर्बंध पत्करावे लागले. "राणा भीमदेवी" आवेशाला रेडिओंत "प्रवेश" नसतो म्हणा ना! सर्व संवाद घरगुती रीतीनें – उभ्या उभ्या वाचायचे!! पाठ करण्याची गरज नाहीं – खास पोषाखाची "सक्ति" नाहीं. 'मेक अप' नको – केशभूषा नको – तरीसुद्धां "भूमिका" सुरस वठविण्याचा तगादा खरोखरीच्या नाटकापेक्षां अधिक कडक – अशीं बंधनें स्वीकारणारा जातिवंत नटच नव्हे अशा (अप) समजुतींत वाढलेल्यांना आकाशवाणीचीं बंधनें पत्करायला लावून त्यांजकडून नित्यनेमानें नाटकें करून दाखविणारा सूत्रधार खरोखर मोठा हिकमतीचा म्हटला पाहिजे. येरां गबाळांना साधणारें हें कार्य नव्हे.

रूपक – संगीतिका ... असे खास रेडिओ-प्रकार लिहिण्याबाबत रेडिओमुळें किती तरी जणांना शिक्षण (अप्रत्यक्ष) मिळालें आहे. "ऑखों-देखा-हाल" सांगण्याची तालीम पुष्कळांना लाभली– आकाशवाणीचे "संजय" निरनिराळ्या केंद्रांत तयार झाले. ह्या सर्व दृष्टींनीं पाहतां आमची प्रगति होत आहे यांत शंका नाहीं.

श्रोत्यांच्या दृष्टीनें विचार करतां रेडिओनें नंदनवन अवनितलावर आणलें असें म्हणतां येतें. संगीत न आवडणारा वगळल्यास, बहुतेकांना रेडिओ हा थोर उपकारकर्ता वाटतो. कुणा धनिकाच्या दिवाणखान्यांत चाललेल्या "मैफली"साठीं महत्प्रयासानें शेजारच्या माडीवर मोठ्या खटपटीनें प्रवेश मिळविणारांना रेडिओची सहज सुलभता समजते. गाणें-बजावणें ऐकण्यासाठीं पूर्वी ज्यांनीं खटपट केली नाहीं त्यांना रेडिओचें सुख यथार्थरीत्या कळणार नाहीं. पांच-सहा "पुरुष" खोलीच्या आडाचें "पाणी शेंदून" काढणारांना नळाचें सौख्य समजतें–तसेंच ह्या गाण्याचें आहे. पूर्वी तें किती दुर्लभ होतें– कधीं तरी साठी-समासी एकाद दुसरी बैठक रंगायची, तिच्या आठवणींवर उभी हयात गुजरायची. अशा लोकांना रोज मेजवानीचा लाभ मिळतो, हा केवढा लाभ! मोगल बादशहांना लाभलें नाहीं तें संगीतवैभव आतां घरोघर उपलब्ध आहे. ही सारी रेडिओकृपा नव्हे काय? वक्ते, नट, गायक, वादक..... अशांचें "श्राव्यदर्शन" आकाशवाणी प्रत्यहीं घडवीत आहे– हा तिचा उपकार अविस्मरणीय म्हटला पाहिजे. म्हणून म्हणतात कीं बादशहांना लाभलें नाहीं असें संगीत-श्रवण-वैभव आज प्रत्येकाला मिळत आहे.

संगीत-शिक्षा, हिंदी-शिक्षा, ग्रामीणांना आवश्यक अशा शेतीबद्दल सूचना, महिलांना नवी शिकवण, मुलांना आकर्षक गोष्टी... असा विविध लाभ रेडिओमुळें होतो. तो आबाल-वृद्धांना, स्त्री-पुरुषांना सारखाच आवडतो. अशी लोकप्रियता अल्पकालांत मिळविल्याबद्दल रेडिओची प्रशंसा करावी तेवढी थोडी ठरेल. जगभरचें संगीत–जगभरचीं बातमीपत्रें– भाषणें घरबसल्या ऐकविणाऱ्या एवढ्याशा जादूच्या पेटीचा हा पराक्रम आहे!! आमच्याकडे संगीताचें इतकें वैविध्य आहे कीं करमणुकीला तोटा पडणारच नाहीं मुळीं. संगीताचे मुख्य प्रकार दोन : शास्त्रीय आणि लौकिक : शास्त्रीय संगीताचे दोन भेद प्रांतभेदामुळें पडतात. दाक्षिणात्यांचें कर्णाटकी संगीत– औत्तरीयांचें हिंदुस्थानी संगीत. रवींद्र संगीत हा एक नवाच प्रकार रूढ झाला आहे. संगीतांत गायनवादन हे दोन मुख्य प्रकार : वादनांत तंतु वाद्यें– तार वाद्यें, 'फूक' वाद्यें, थाप वाद्यें... असा प्रकार किती तरी होतो. लौकिक संगीतांत लोकगीतें, फिल्मी गाणीं, भावगीतें, भजनें असे भाषावारीचे प्रकार आहेत.

प्रत्येक केंद्राचा कार्यक्रम स्वतंत्र असला तरी पुष्कळ कार्यक्रम "ग्रथित' असतात. म्हणजे एका केंद्रावर ते होतात – इतर केंद्रावर ते त्याच वेळीं तसेंच ऐकवितात ( = सहक्षेपित होतात. ) प्रत्येक भाषेतली बातमी मुख्यतः दिल्लीवरून सांगतात– ती इतर स्टेशनें हवी असेल तशी पत्करतात. इंग्रजी (सकाळीं ८, दुपारीं १॥; संध्याकाळीं ६ व रात्रीं ९ वाजतां) बातम्या

आपण ऐकतों त्या दिल्लींत " उगम " पावतात. हिंदी, मराठी, गुजराती, बंगाली, तामीळ, तेलगु, कानडी, आसामी, उर्दू, पुश्तु, काश्मिरी ... अशा अनेक भाषांतील बातम्या मुख्यतः दिल्लीहून सांगाव्या अशी आमच्या रेडिओची एक " लहर " आहे. दिल्लीवरून येणाऱ्या बातम्यांचें सहक्षेपण ही प्रत्येक केंद्राची प्राप्त जबाबदारी आहे. पुण्याला इंग्रजी व मराठी बातम्या तेवढ्या सहक्षेपित करतात. मुंबईहून हिंदी, मराठी, गुजराती, इंग्रजी या चार भाषांतील बातम्या रोज–अनेकदां–सहक्षेपित कराव्या लागतात. त्यामुळें दिल्लीकडे नजर ठेवून वागावें लागतें.

सहक्षेपण हें बातम्या पुरतेंच नाहीं. शनिवारीं रात्रींचा राष्ट्रीय संगीत कार्यक्रम; रविवारीं रात्रींचें राष्ट्रीय भाषण; आठवड्यांतून दोनदां " वार्ताचित्र " ( इंग्रजी आणि हिंदी ) असे अनेक कार्यक्रम नित्य-सहक्षेपणांपैकीं होत. याखेरीज कुणा प्रतिष्ठित पाहुण्याचें भाषण, राष्ट्रपति, पंतप्रधान, अशांचें प्रवचन, पार्लमेंट चालू असेल तेव्हां त्यांतील कामकाजाचा अहवाल ( इंग्रजी वा हिंदी ) ही नैमित्तिक सहक्षेपणें होतात. कार्यक्रम हवेंत सोडण्यासाठीं लागणारें यंत्र ट्रान्समीटर तसेंच दुसरें यंत्र बाहेरचे येणारे कार्यक्रम " पत्करणारें " यंत्र ( = रिसीव्हिंग सेंटर ) असतें. ह्या सर्व यंत्रांचीं तंत्रें सांभाळतां सांभाळतां कुणाच्याहि नाकीं नव येतील. तरी आमचे आकाशवाणीचे "इंजिनियर्स" हें सर्व काम बिनबोभाट पार पाडतात–ही आमची प्रगति होय.

रेडिओचें तंत्र म्हणतात तें झपाट्यानें बदलत आहे. त्यांत सुधारणा इतकी भराभर होत आहे कीं कालचा इंजिनियर उद्यां मागासलेला ठरतो. तंत्र आहे तें कार्यक्रम हवेवर सोडण्याबाबत–आणि सोडलेला योग्य प्रकारें घरोघर पोचविण्याबाबत. अगदीं सोप्या भाषेंत हें तंत्र सांगतां येतें. कार्यक्रम होतो तो " आवाज " मय–नाद-मय-असतो. ह्या नादाच्या "लहरी" असतात (=साऊंड वेव्हज् ) त्यांना जगभर हवें तिथें पाठविणें हें कार्यक्रमांतलें अर्धें काम; दुसरें अर्धें म्हणजे त्या आकाशांतील लहरी पकडून त्यांजकडून तो कार्यक्रम घरोघर श्रोत्यांसाठीं सुसह्य बठविणें, हें रेडिओमुळें साधणारें. श्रोते रेडिओ विकत घेतात– घरीं तो बाळगल्याबद्दल दर साल ( पोस्टामार्फत ) भारत सरकारला फी भरतात. रेडिओचें खातें चालू ठेवण्यासाठीं प्रत्यक्ष पैसा भरणारा म्हणून प्रत्येक परवानेदाराला आपली आवड-निवड त्या खात्याला कळविण्याचा हक्क आहे. अद्याप असा हक्क बजावणारे नागरिक फारसे आढळत नाहींत ही आमच्या राज्यव्यवस्थेची शोककथा आहे! रेडिओचे कार्यक्रम समाधानकारक होत नाहींत– त्यांत काय चुकतें किंवा कुठें चुकतें हें सर्वांनाच सांगतां येणार नाहीं आणि सर्वांनीं आपापली आवड स्पष्टपणें कळविली तरी रेडिओला सर्वांना सर्वकाळ खूष राखतां येणार नाहीं. कार्यक्रमांत व्यवहारी मध्यममार्ग पत्करावा लागेल हें उघड आहे.

लोकानुरंजनाचें हें खातें. त्याचें सामर्थ्य त्याच्या लोकानुरंजनांत आहे. लोकानुरंजनाचें प्रमाण कमी झालें कीं श्रोते रेडिओ बंद करतील, हें लक्षांत ठेवलें पाहिजे. रेडिओच्या सामर्थ्याचा राष्ट्रहितासाठीं उपयोग करून घ्यावयाचा तर त्याचें हें सामर्थ्य कमी होऊं देऊं नये– तें वाढवीत रहावें– हा शहाणपणाचा मार्ग होय. पण सरकारी खातें– ' लालफीत वेष्टित ' भारत सरकारचें– खातें- हें लोकानुरंजनाचें काम पत्करतें ही मोठी धाष्टर्याची बाब होय. सरकारवर लादलेली ही जबाबदारी होती– ती पत्करूं नये असें स्पष्टपणें बजावणारे अधिकारीहि होते– तरीदेखील सरकारी खातें म्हणून हें लोकानुरंजनाचें कार्य चालवावें लागलें. आमच्याकडे ' पोलिसी ' करणाऱ्या अधिकाऱ्यांची ' श्रेणी ' ( इंडियन पोलिस सर्व्हिस ) आहे. जंगली काम करण्यासाठीं फॉरिष्ट हपसरांची श्रेणी आहे, वकिलातींत काम करणारांची श्रेणी स्वराज्यानंतर ' तयार ' झाली. पण रेडिओ सारख्या प्रभावी तंत्राचा वापर करणारी श्रेणी आम्हीं अद्याप केली नाहीं, यावरून ह्या आकाशवाणीचें वास्तविक बल आम्हांस समजलें नाहीं असें म्हणावें कीं काय ?

हिंदुस्थानासारखा विस्तृत देश; विविध भाषा; विविध लोकसमूह– त्यांचीं विशिष्ट लोकगीतें; अवघ्या राष्ट्राला " साक्षर " करण्याचें अवाढव्य कार्य; आरोग्याचा संदेश खेडोपाडीं पोचविण्याची जबाबदारी; लाखो खेड्यांतल्या ' अज्ञ ' जनांना, विज्ञान, राजकार्य, इत्यादि अवघड विषयांची तोंड-ओळख करून देण्याची संधि; शेतीबद्दल नव्या सूचना सांगून धान्य-










पैदास वाढविण्याचें महत्कार्य पत्करण्याची तयारी–लोकशाही कारभाराची माहिती खेडोपाडीं प्रसृत करण्याची थोर कर्तबगारी... अशांमुळें वास्तविक कर्तृत्वाला चेव यावयास हवा-होता. महत्त्वाकांक्षी नवजवानांना ईर्षा वाटावयास पाहिजे होती. निष्ठेनें, तंन्मयतेनें कार्य पार पाडण्याच्या दृढ निश्चयानें, त्यांनीं अशा कार्यास वाहून घ्यावयास हवें होतें. पण असे युवक दुर्लभ आहेत कीं त्यांना अनुकूल वातावरण मिळत नाहीं ? दोहोंपैकीं कांहीं तरी कारण असलें पाहिजे. कारण रेडिओंत "पगारदार" अधिकारी पुष्कळ आहेत. खरा "हाडाचा रेडिओ सेवक" अत्यंत दुर्मीळ झालेला दिसतो. असो.

आमच्या रेडिओ खात्याची खरी कर्तबगारी पारखण्यासाठीं कांहीं तुलना अपरिहार्य आहे. ती "ब्रिटिश" रेडिओशीं आहे – म्हणून तिजकडे दुर्लक्ष करण्याची खोड कित्येकांना आहे. परंतु तुलनेशिवाय यथार्थ गुणपरीक्षा होत नाहीं. पहिली तुलनेची बाब म्हणजे वार्षिक अहवालाबद्दल आहे. ब्रिटिश ब्रॉड कास्टिंग कॉर्पोरेशन (= बी. बी. सी.) चा अहवाल दर वर्षी प्रसिद्ध होतो. त्यांत त्या खात्याची इतकी सविस्तर माहिती खेचून भरलेली असते कीं त्याच्या शतांश माहिती आमच्या आकाशवाणीनें दिली तरी उपकार होतील असें म्हणावें लागतें. आमच्याकडेहि असा एक अहवाल प्रसिद्ध झाला होता तो स. १९३९ चा आहे. "साहेब" त्या खात्याचा प्रमुख होता तेव्हां त्यानें तो प्रसिद्ध करविला. त्यानंतर तसा अहवाल ऑल इंडिया रेडियोनें प्रसिद्ध केलाच नाहीं – ही पहिली तुलनेची बाब.

ब्रिटनममध्यें रेडिओचा प्रसार अधिक झाला असल्यास नवल नाहीं. पण तो किती अधिक आहे ? टेलिव्हिजन किंवा साधा रेडिओ यांचे मिळून दीडकोट परवानदार तिकडे आहेत. (आमच्याकडे २० लाखांपर्यंत मजल नुकतीच गेली !). यापैकीं फुकट परवानदार ५५ हजार सुमार, "अंध" श्रोते आहेत. (आमच्याकडे अवघ्या २० अंधांची नोंद आहे. गेल्या वर्षीं ती ४५ जणांची होती). रेडिओ टाइम्स म्हणून कार्यक्रम पत्रिका दर आठवड्यास छापतात–तिचा खप (स. १९५९ मध्यें) ७२ लाखांवर (दर आठवड्याचा) होता. (ह्या बाबतींत आमचे आंकडे कुणालाच न कळविण्याचा शिरस्ता रूढ आहे.) ब्रिटनमधील एकूण २८८७५ शाळांत रेडिओ कार्यक्रम ऐकण्याची सोय होती (स. १९५९) आणि कार्यक्रमावर आधारलेल्या ७२ पत्रकांची मिळून ८० लाखाहून अधिक प्रतींची विक्री झाली. (आमच्याकडे १५,९७१ शाळांत रेडिओ ऐकण्याची सोय होती. कार्यक्रमपत्रिका विविध भाषांत असल्यानें तिचा छपाईचा सुद्धां आंकडा वर्णनीय नाहीं). एकंदर कार्यक्रमापैकीं शेंकडा साडेसहा टक्के वेळ शालेय कार्यक्रमाला ब्रिटनमध्यें मिळाला. (आमच्याकडील गेल्या वर्षाचा आकडा सुमारें तीन* टक्क्यापर्यंत येईल.) ब्रिटनमध्यें चार निरनिराळ्या प्रकारचे कार्यक्रम (एकाच वेळीं) ऐकविण्याची सोय आहे–होम, लाईट, थर्ड–नेटवर्क थ्री–असे चार कार्यक्रम आवडीनिवडीनुसार ऐकतां येतात. त्यांचा वर्षभराचा मिळून तासांचा हिशेब असा.

| | | | |
|---|---|---|---|
| होम- | वर्षभरांत | ६२२९ | तास |
| लाइट- | ,, | ६५०६ | ,, |
| थर्ड- | ,, | १४१६ | ,, |
| नेटवर्क थ्री | ,, | ६२० | ,, |
| | | १४,७७१ | |

असा वर्षभरांतला बी. बी. सी. चा हिशेब आहे. पण आमच्या हिशेबाची रीत न्यारी आहे. आम्ही बढाई मारतों कीं एकंदर कार्यक्रम आमच्याकडे अधिक वेळ चालतात.

स. १९५९ मध्यें १०५,६११ तासांचा कार्यक्रम ऑल इंडिया रेडिओनें पार पाडला आणि स. १९६० चा आंकडा १०८,२५६ तासांवर गेला. ह्या दोन्ही आंकड्यावरून आमच्या हिशेबाचें वैशिष्ट्य कळतें. वास्तविक नवें केंद्र निघालें नसतां अधिक तास कार्यक्रम होतील कसे ? आणि वर्षभरांत मिळून २८ केंद्रांच्या कार्यक्रमांत तीन साडेतीन हजार तासांची भर पडेल कशी ?

या शंकेचें उत्तर सोपें आहे. पंधरा मिनिटांची बातमी दिल्लीहून सांगतात आणि २८ केंद्रें ती सहक्षेपित

* कार्यक्रमाच्या वेळेचा हिशेब करण्याची ब्रिटिश पद्धत आणि आमची पद्धत, या दोन्हींत भयंकर तफावत आहे.







करतात. तेव्हां ब्रिटिश पद्धतिप्रमाणें (आणखी कितीहि केंद्रांनीं ती सहक्षेपित केली तरी) हा कार्यक्रम **पाव** तासाचा; तर ऑल इंडिया रेडिओच्या हिशेबा प्रमाणें हा **सात तासांचा** कार्यक्रम ठरतो. यांत रास्त पद्धत कुणाची, गैर कुणाची, हें जाणत्यांनीं ठरवावें.

बी. बी. सी. च्या उत्पन्नाची, नफ्यातोट्याची. मालमत्तेची एकंदर कार्यकर्त्यांची, इतकी तपशीलवार माहिती दरवर्षी न चुकतां मिळते कीं आज २०-२५ वर्षांचा हिशेब पाहिजे असला तरी कोणत्याहि ग्रंथालयांत तीं पुस्तकें कुणालाहि मिळतात. आमच्याकडे मात्र सर्वत्र आळी-मिळीचा प्रकार. कुठलाच हिशेब उघड नाहीं. पार्लमेंटला देखील तो सादर होत नाहीं. मग इतर पृच्छकांना विचारतो कोण ? 'ऑडिटर-जनरल'च्या दरवर्षीच्या रिपोर्टांत ऑल इंडिया रेडिओच्या 'आंतबट्ट्या' च्या कारभारावर थोडी टीका आढळते. कारण लायसेन्स फी आणि रेडिओ साहित्यावरील आयात जकात-एवढें रेडिओचें उत्पन्न समजतात. वास्तविक रेडिओचें खातें वेगळ्या रीतीनें चालविलें पाहिजे ...... त्याचें उत्पन्न ठरलेलें पाहिजे ...... परदेशांसाठीं कार्यक्रम होतात, त्यासाठीं परराष्ट्रखात्याकडून वेगळी तैनात हवी ... पण असें कांहीं होत नाहीं– जिज्ञासूंना योग्य माहिती, आवश्यक ते आकडे, जमाखर्चाचा तपशील कांहीं मिळत नाहीं. मग मूल्यमापन करावें कसें ?

कार्यक्रम करणारांना ताबडतोब पैसे देण्याची व्यवस्था रेडिओची आहे–तशी इतर सरकारी व्यवहारांत नसल्यामुळें कित्येकांना आकाशवाणीचें प्रलोभन वाटतें. "इस हाथ ले, उस हाथ दे" असा जवळ जवळ प्रकार तिथला असतो. भाषण, गाणें, नाटकांतलें अगर इतर काम झालें, (टेप वर टिपून घेतलें तरी) पैसे हातीं मिळतात. पण अभ्यासकाला कळायला हवें कीं ह्या भारत सरकारच्या करमणुक खात्यानें कलावंतांचा दर्जा सुधारला कीं नाहीं ? भाषण करणारांना, नटांना, कविता म्हणून दाखविणारांना रेडिओ कडून मिळतात ते पैसे, महागाईच्या प्रमाणांत वाढले कीं नाहीं ? इतर देशांच्या मानानें हे दर कमी आहेत कीं अधिक ? बी. बी. सी. चा हिशेब असा आहे. —

दर तासभराच्या कार्यक्रमाचा खर्च (सरासरी)

**स्वदेशी कार्यक्रम**

| | | |
|---|---|---|
| १. कार्यक्रम करण्यासाठीं | पौंड | ३०९ |
| २. इंजिनियरिंग | ,, | १३० |
| ३. इतर | ,, | ११९ |
| दर तासीं – | पौंड | ५५८ |

**परदेशी कार्यक्रम**

| | | |
|---|---|---|
| १. कार्यक्रम करण्यासाठीं | पौंड | १०० |
| २. इंजिनियरिंग | ,, | ४९ |
| ३. इतर | ,, | ३८ |
| दर तासी – | पौंड | १८७ |

– हे आकडे– अशाच प्रकारचे आकडे-ऑल इंडिया रेडिओनें कां जाहीर करूं नयेत ? प्रत्यक्ष तसे काटेकोर हिशेबाचे आकडे रेडिओनें जाहीर केले नसले तरी इतर सरकारी कागदपत्रांत प्रकट झालेल्या माहितीवरून सांगतां येतें कीं देशभरच्या रेडिओ केंद्रांचा कलावंतांसाठीं खर्च खालील प्रमाणें झाला —

| | |
|---|---|
| स. १९४९-५०– | ३० लाख रु. |
| ५०-५१– | ३५ ,, ,, |
| ५१-५२– | ३४ ,, ,, |
| ५२-५३– | ३५ ,, ,, |
| अंदाजें ५७-५८– | ७४ ,, ,, |
| अंदाजें ५८-५९– | ७४ ,, ,, |
| अंदाजें ५९-६०– | ७९ ,, ,, |

आकाशवाणीची हिशेबी पद्धत आहे तीप्रमाणें **एकंदर** कार्यक्रम किती तास साल-दरसाल याचीहि **आकडे**वारी मिळते. मध्यंतरीच्या कांहीं वर्षांसाठीं (स. १९५२-५६) आकडे उपलब्ध नाहींत– तसे ते वरील हिशेबासाठींहि नाहींत.

| | |
|---|---|
| स. १९४३ – | ३६४२६ तास |
| स. १९५० | ६४५२९ ,, |
| ,, ५१ | ७३०७२ ,, |
| ५२ | ७४,६४० ,, |
| १९५७ – | ९९३२६ ,, |
| ५८ – | १००,४१७ ,, |
| ५९ | १०५,६११ ,, |
| ६० | १०८,२५६ ,, |

वरच्या हिशेबावरूनहि समजतें कीं ऑल इंडिया रेडिओच्या 'कामा'चे तास अवास्तव आहेत. कारण



अनुक्रमणिका








स. १९५०-५३ या तीन सालांसाठीं सुमारें १०४ लाख रु. खर्च झाले आणि त्या तीन वर्षांत मिळून सुमारें २१२००० तासांचे कार्यक्रम झाले. दर तासीं अवघे ५० रु. ढोबळमानानें खर्च कार्यक्रमासाठीं होत असेल तर हा सर्वांत सस्ता सौदा समजावा. चार भाषणांना निदान रु. १०० पडतात (पंधरा मिनिटाला रु. २५ या दरानें) भाषणें दहा मिनिटांचीं धरल्यास अधिक खर्च होईल. गाण्याचेंहि असेंच. मग ही सरासरी "स्वस्त" येते, याचें कारण हिशेब चुकला आहे. सह-क्षेपणाचे तास कार्यक्रमाचे ठरत नाहींत.

ऑल इंडिया रेडिओचें हें मर्यादित क्षेत्र- देशभर मिळून २८ केंद्रें- असल्यानें ह्या नव्या तंत्राचा फायदा पुष्कळांना घेतां येत नाहीं. वास्तविक प्रत्येक मोठ्या शहरांत, नव्या औद्योगिक वस्तींत- नव्या शालेय-शहरांत ... रेडिओ केंद्र पाहिजे. जेवढ्या भाषा प्रचलित आहेत- तेवढीं केंद्रें असण्यास प्रत्यवाय नाहीं. ह्या नव्या तंत्राशीं संपर्क जितका वाढेल तितके नवे तंत्रज्ञ, नवे कारागिर, नवे कलावंत तयार होतील. समाज संपन्न होईल- देशभर रेडिओचा प्रसार होईल. आमच्याकडे कुणीं कांहीं तरी (अप) समज करून दिल्यामुळें किंवा कांहीं इतर कारणामुळें असेल युनिःहर्सिट्यांनाहि रेडिओ-केंद्रें काढूं दिलीं नाहींत; शक्तिशाली केंद्रें काढण्याकडे आम्हीं निष्कारण भर दिला. मध्यम लहरीचे ट्रान्समीटर्स आमचेकडे आहेत ते-

५० कि. वॅ. चे ६
२० ,, ,, ,, ८
१० ,, ,, ,, ३
५ ,, ,, ,, ४
१ ,, ,, ,, ८

इतक्यांची कांहीं गरज होती असें नाहीं कारण नुकतीच आणखी ५६ मध्यमलहरी ट्रान्स्मीटर्स बसविण्याची योजना जाहीर झाली आहे.

१०० कि. वॅ. चा १
५० ,, ,, ,, १
२० ,, ,, चे १५
१० ,, ,, ,, ८
५ ,, ,, ,, ४
१ ,, ,, ,, २७

दोन तीन वर्षांत घिसाडघाई करून इतके ट्रान्समीटर्स बसविण्याचें कारण मात्र अजब दिलें आहे. त्यासाठीं इतके शक्तिशाली "क्षेपक" लागतात- हें नवेंच तंत्र म्हटलें पाहिजे. वास्तविक रेडिओचीं हीं साधनें-उपकरणीं जमतील तितकीं देशांतल्या देशांत बनवावयाचीं. पण या नाहीं त्या योजनेखालीं मिळतात म्हणून भराभर "क्षेपक" आयात करण्यांत (= "फुकटांत मिळविण्यांत") फार मोठी चूक झाली असें वाटतें. जर्मनीकडून खंडणी वसूल करतांना ती तयार मालाच्या स्वरूपांत घेतल्यामुळें उद्योगधंद्यांवर होणारा विपरीत परिणाम लक्षांत येण्यास अवधि लागला. तशीच आमच्या आकाशवाणीची ही मोठी चूक होय. भारत इलेक्ट्रॉनिक्स हा रेडिओ साहित्य बनविणारा कारखाना देशांत असतां परदेशांतून साहित्य आणावयास (फुकट मिळालें तरी) नको होतें.

इतर देशांत ट्रान्समीटर्स किती असतात, स्टेशनें किती ठेवतात- आणि त्यांच्याकडे परवानदार किती असतात- याचें दोन वर्षांपूर्वीचें कोष्टक मांडल्यावर आमच्या आडमुठेपणाची कल्पना येईल.

| | | | | |
|---|---|---|---|---|
| इंडोनिशिया- | १० लाख | परवानदार : | ६९ | ट्रान्स० |
| जपान- | १५० | ,, ,, | : १९१ + ९५ | ,, |
| फिलिपाईन बेटें | ३ | ,, ,, | ८५ | ,, |
| ऑस्ट्रेलिया | २१ | ,, ,, | १८१ | ,, |
| न्यूझीलंड | ६ | ,, ,, | ३२ | ,, |
| फॉर्मोसा बेट | २॥ | ,, ,, | ७३ | ,, |

यांतील बहुतेक ट्रान्समीटर्स एक, अर्धा, पाव, अष्टमांश कि. वॅ. शक्तीचे असून कांहीं सरकारी- कांहीं व्यापारी ट्रान्समीटर्स आहेत. आमच्याकडे रेडिओ ही सरकारी मक्तेदारी असल्यानें इतर कुणाला रेडिओचें तंत्र-इंजिनियरींग किंवा कार्यक्रमाचें- शिकण्यासाठीं चांगली सोयच नाहीं. चाळीस कोटींच्या आमच्या देशांत २८ केंद्रें म्हणजे अगदींच थोडीं ! ! आमचे होतकरू इंजिनियर शिकून तयार व्हावे कुठे ? आमचे बुलारी, "आँखों देखा खाल" सांगणारे "तल्यारखान" आमच्यांतून निघावे कसे ? त्यांना अनुभव कुठें मिळावा ? स्पुटनिक, शुक्राचा वेध घेणारा उपग्रह, चंद्राच्या दुसऱ्या बाजूचा फोटो आणणारा मानवी उपग्रह,








या सर्व तंत्रांत रेडिओज्ञानास अत्यंत महत्त्व आहे. आणि आमच्याकडे सरकारी धोरण पहावें तो रेडिओ " चूक, चाकू, कात्री, या प्रमाणें " खेळणें नव्हें असें मानण्याचें आहे. लहान मुलांना रेडिओशीं खेळूं दिलें – रेडिओ हा अनिर्बंध खेळ ठरविला – तरच आमच्या देशाची त्या आवश्यक तंत्रशाखेंत कांहीं तरी प्रगति होईल. आणि ह्या तंत्राकडे दुर्लक्ष करणाऱ्या राष्ट्राला सध्यांच्या जगांत मान आहे कुठें ? म्हणून रेडिओचें सामर्थ्य यथार्थरीत्या आकलन झालेली आकाशवाणी आम्हांस हवी आहे– सध्यां आहे तशी लाल फीत वेष्टित सरकारी दिरंगाई बहाद्दर– आम्हांस नको असें प्रत्येक श्रोत्यानें सरकारला स्पष्ट सांगणें जरूर आहे.

परंतु याहि पेक्षां महत्त्वाची बाब म्हणजे ऑल इंडिया रेडिओचा कारभार "लहरी" पद्धतीनें चालू आहे. रेडिओचें तंत्र बदलत आहे. झपाट्यानें बदलत आहे – तरी आमचें हें खातें अजून जुन्याच जमान्यांत वावरतें ! बी. बी. सी. चा कारभार इतका खुला आहे – तरी तिच्या कारभाराची चौकशी करण्यासाठीं आतां पर्यंत " तीन " कमिशनें नेमलीं होतीं. अशी चौकशी समिति जितकी वारंवार नेमतां येईल तितकी नेमावी असा तिकडल्या शेवटच्या समितीचा आशय होता. आमच्याकडे रेडिओ चौकशी झालीच नाहीं. निदान पांच सात वेळां पार्लमेंटांत चौकशी कमिशनची मागणी झाली– पण मंत्र्यांनीं ती साफ धुडकावली. फिल्मीव्यवहार पुष्कळसा खासगी हातांत आहे – तरी त्याबद्दल आतांपर्यंत आम्ही दोन चौकशी कमिट्या नेमिल्या – आणि रेडिओबद्दल मात्र एकहि नेमली नाहीं–नेमण्याचा विचार नाहीं ! ! ही सरकारची शिताफी कीं आमच्या संसदीय सभासदांची सहनशीलता ? चौकशी समितीनें निर्भीडपणें चौकशी केली तर आतांपर्यंत अत्यंत लहरीपणानें चाललेल्या ह्या कारभारावर विदारक टीका होईल हीच भीति सरकारला वाटते, दुसरें काय ?

रेडिओबाबत सरकारी धोरण ' विनोदी ' म्हणण्यास हरकत नाहीं. बंदुका-तोफांपेक्षां किंवा पादचाऱ्यांचा जीव घेणाऱ्या यांत्रिक वाहनांपेक्षां घरगुती रेडिओ हें भयंकर शस्त्र आहे अशा भावनेनें आमचें सरकार वागत आहे. ' रेडिओ ' परवान्याची फी लहरीनुसार दहाची पंधरा केली. दुसऱ्या लहरीनें असें ठरविलें कीं सर्व परवाने डिसेंबर अखेर संपतील. जानेवारींत ते नवे करून घ्यावे. बोलून चालून लहरच ती. तिला व्यवहारी अडचण सुचावी कशी ? एक महिन्यांत लाखो परवाने नवे करून मिळावे कसे ? पण हाहि विचार न करतां नवा परवाना काढण्यास उशीर झाल्याबद्दल भराभर दंड ठोठावण्यास सुरवात केली. जिकडे तिकडे ओरड माजली तेव्हां आणखी एक ' लहरी ' हुकूम सुटला – दंड परत द्यावा– परवाने नोव्हेंबर पासून नवें करून देण्यास सुरवात करावी. लोकांचे लाखो रु. महिना-दोनमहिने बिनव्याजीं ठेवून घेण्याचा अधिकार सरकारला कसा पोचतो ? परवान्याचा अर्ज इतका किचकट केला होता – त्याच्या दोन तीन प्रती इंग्रजींत भरून द्याव्या लागत– अशा सर्व भानगडीं-मुळें रेडिओ बिनपरवाना वापरण्याची सक्ति जनतेवर लादल्यासारखें झालें ! रेडिओ विक्रेत्यांजवळ परवाने मिळण्याची सोय करतां येणें अशक्य नाहीं. पण अधिकाऱ्यांच्या हातची सत्ता सुटते कुठें ? नवें खातें काढण्यास–त्या खात्याच्या नांवानें खर्च वाढविण्यास– लोकांना छळण्यास–मिळावें अशी जणु अधिकाऱ्यांची इच्छा दिसते. पोस्ट खात्याच्या कारभारांत तपशील सापडतो तो असा :– बिनपरवाना रेडिओ कोण वापरतो हें तपासण्यासाठीं एक खातें काढलें. स. १९५७-६० या चार वर्षांत त्या खात्यांतलीं माणसें २०१, २२१, २३९, २९६ अशा प्रमाणांत वाढलीं. त्यांनीं खटले भरले-लोकांकडून अडीच, पावणेचार, साडेचार आणि साडेपांच लाख रुपये वसूल केले खरे; पण त्या खात्याचा खर्चच मुळीं इतका होता कीं चार वर्षांत मिळून १२-१२॥ लाख रु. बट्टा तोटा सोसावा लागला ! ! मग हें खातें काढलें कशासाठीं ? सोळा अठरा लाखांत शेकडा एक दोन ' बिनपरवानेवाले ' सापडले म्हणून सरकारनें त्यावर असा सूड उगवूं नये. रेडिओ–बाबत आमच्या सरकारची साशंकी आणि शिक्षा ठोठावण्यास हपापलेली वृत्ति अपूर्व आहे - तिला दुनियेंत तोड सांपडणार नाहीं ! !

रेडिओ खरेदी करण्याआधीं परवाना घ्यावा लागतो; रेडिओ नादुरुस्त झाला, कुचकामी झाला








तरी फी भरावी लागते: " रद्दी " ठरला, विकून टाकला तर सर्टिफिकिट दाखल करावें लागतें; रेडिओ वापरणारा घरांत नसला किंवा रेडिओ बंद ठेवून वर्ष सहा महिने कुणीं परदेशी गेला तरी रेडिओ फी भरली पाहिजे; भरण्यास उशीर झाला तर दंड पत्करला पाहिजे ...... अशा इतक्या अडचणी पोस्टखातें घालतें कीं सरकारचा हेतु रेडिओ-प्रसाराचा आहे कीं बिनपरवाना रेडिओ वापरण्यास प्रोत्साहन देण्याचा आहे हें कळत नाही आणि पोस्टाचे हे चाळे आकाशवाणीच्या अधिकाऱ्यांना समजत नाहींत कीं काय ?

इतर देशांत रेडिओचा प्रसार इतका कां झाला याचा शोध करतां कळतें कीं घरगुती रेडिओ बनविण्याची व्यवस्था तेथील कारखानदारांनीं केली. प्रत्येक रेडिओचे सुटे भाग एकत्र देऊन ते कसे जुळवावे याचें सूचना पत्रक बरोबर दिलें. त्यामुळें घरोघर रेडिओ बनवितां आले- ते स्वस्त पडले ! पण आमच्या सरकारची असें राष्ट्रोपयोगी कार्य करण्याची तयारी आहे काय ?

रेडिओचें तंत्र नवजवान शिकतील तेवढें हवें आहे. आकाशवाणीची नेहमींची रड आहे कीं इंजिनियरिंगकडे पुरेशी माणसें मिळत नाहींत ! ! देशांत एकीकडे बेकारी आणि रेडिओ सारख्या साध्या इंजिनियरिंग शाखेंत शिकलेले लोक मिळत नाहींत ही तक्रार ! याहि बाबतींत ऑल इंडिया रेडिओ अव्यवहारीपणें चालत असल्याचें दिसतें. बी. बी. सी. नें रेडिओ इंजिनियरिंगची वेगळी व्यवस्था केली आहे. दरवर्षी.१७ शाखांत ( इंजिनियरिंगच्या ) मिळून २४० विद्यार्थी स्वीकारतात. अठरा वर्षांच्या युवकानें सवडी सवडीनें हें काम शिकून घ्यावें म्हणून "सँडविच् कोर्स" ची सोय करून दिली-अशी आमच्या आकाशवाणीला साधणार नाहीं कीं काय ? इंजिनियरिंग बाबतींत प्रयोगांना, कल्पकतेला वाद देण्याची बी. बी. सी. ची पद्धत अनुकरणीय आहे. रेडिओसाठीं लागणारे लाउडस्पीकर्स, मायक्रोफोन इत्यादि नाजुक अवजारें बी. बी. सी. स्वत: बनवितें. प्रत्यक्ष करीत राहिल्यानें मिळणारा अनुभव बहुमोल असतो- तो जवानांना मिळवून देणें हें राष्ट्रहिताचें-- तो टाळणें हें राष्ट्रहानिकारक-इत्यादि जाणीव आमच्या आकाशवाणीला- आतां तिनें पंचविशी गांठली असल्यानें- होईल अशी आशा करूं या.

आकाशवाणीच्या २५ वर्षांतील कामगिरींचा आढावा घेतांना 'परदेशी' खात्याचें काम पाहिलें नाहीं; मुद्रिकांचें खातें विचारार्थ घेतलें नाहीं; संशोधन खात्याची तपासणी केली नाहीं- बातमी-कचेरीची कर्तबगारी मापली नाहीं; टिपण-काम ( मॉनिटरिंग ) सिमल्यांत चालतें त्याची दखल घेतली नाहीं... या सर्व उणिवांची जाणीव ठेवूनहि कांहीं 'लहरी' सांगाव्या असें वाटतें. आकाशवाणीचा कार्यक्रम "लहरीं" वर अवलंबून असतो. लघु, लघुतर, लघुतम, मध्यम, लंब ... अशा पांच प्रकारच्या "लहरीं" चें हें साम्राज्य आहे म्हणूनच कीं काय कोण जाणे, आमच्या ऑल इंडिया रेडिओच्या कारभारांत "लहरी" पणा शिरला आहे. त्यापैकीं कांहीं लहरी अशा-

१. देशभरच्या श्रोत्यांनीं कोणती बातमी कशी ऐकावी, हें दिल्लींतल्या बातमीखात्यानें ठरवावें; ती बातमी दिल्लीनें सांगावी ! बातमी ऐकण्याची निरनिराळ्या भाषांतली वेळदेखील दिल्लीनेंच ठरवावी.

**सकाळीं--**

| | | |
|---|---|---|
| ७ | वाजतां | तेलगु; आसामी |
| ७। | ,, | तामीळ; ओरिया |
| ७॥ | ,, | बंगाली; मल्याळम् |
| ७॥। | ,, | कानडी |
| ८ | ,, | इंग्रजी |
| ८। | ,, | हिंदी |
| ८॥ | ,, | पंजाबी; मराठी; काश्मीरी |
| ८॥। | ,, | गुजराती |
| ८-५० | ,, | उर्दू |

अशी निरनिराळी वेळ ठरविण्यांत "लहरी" चा प्रभाव दिसतो.

२. आकाशवाणी कार्यक्रमाच्या पत्रिका सर्वच भाषांत नाहींत. इंग्रजी पत्रिका साप्ताहिक आहे; तर आवाज ( उर्दू ), सारंग ( हिंदी ), बेतार जगत् ( बंगाली ), वानोली ( तामिळ ), वाणी ( तेलगु ) आणि नभोवाणी ( गुजराती ) हीं पाक्षिकें आहेत. आसामी, ओरिया, मराठी, कानडी, मल्याळम् या भाषांतली कार्यक्रम-पत्रिका कां नसावी ? 'लहरी' शिवाय कांहीं कारण नाहीं !

३. परदेशी विभागांत गुजराती, कोंकणी, तामिळ आणि हिंदी ... एवढयाच चार देशी भाषा कां पत्क-रल्या ? कोंकणी ही १४ भाषांपैकींहि नव्हे– तरी तिचें प्रस्थ परदेशी विभागांत कोणत्या खास लहरीसाठीं केलें आहे ?

४. मुंबई केंद्रावरून इंग्रजी पुस्तकांचें परीक्षण होतें तेव्हां पुस्तकें विकत कुणीं घ्यावीं ? सर्वच पुस्तकें ब्रिटन–अमेरिकेंत प्रसिद्ध झालेलीं असावीं असें ठरलें आहे काय ? देशांतल्या देशांत प्रसिद्ध झालेल्या किती इंग्रजी पुस्तकांचें परीक्षण १२ महिन्यांत मुंबईहून झालें ? मराठी पुस्तकांचीं परीक्षणें मुंबई– पुणें – नागपूर – अशा तीन केंद्रावरून सहक्षेपित कां करावयाचीं ? इंग्रजी पुस्तकें विकत घ्यायचीं आणि मराठी पुस्तकाच्या दोन दोन प्रती "भेट" म्हणून आल्या, तें पुस्तक परीक्षणार्ह असलें, तरी त्याचें परीक्षण होत नाहीं हा सर्व लहरी कारभार नव्हे काय ? इंग्रजी मराठी पुस्तकांचीं परीक्षणें मुंबईनें किती केलीं; पुस्तकासाठीं खर्च किती झाला; फी किती दिली आणि परीक्षण केलेलीं पुस्तकें कुठें आहेत याचा नुसता तपास करावा म्हणजे लहरी कारभाराची ओळख होईल.

५. मुंबई केंद्रावरील ( अ ) आणि ( ब ) या दोन ट्रान्समीटर्सची अदलाबदल कां करतात हें कुणीं सांगेल का ? मराठी कार्यक्रम कोणत्या 'क्षेपका' वर आणि गुजराती कोणत्यावर हें कांहीं ठरविलें नाहीं म्हणजे ठरविलें आहे तें 'लहरी' आहे. मराठी श्रोत्यांना २८८ मी. पासून ५४५ मी. पर्यंत पुढें मागें दिवसां-तून किती वेळां कां करावें लागतें ? इतर कुठल्याहि बहुभाषी केंद्रास असें चालतें का ? मराठी श्रोत्यांवर ही खास मेहरबानी का ?

६. " नियोजित श्रवण" - (प्लॅन्ड लिसनिंग) इतक्या वर्षांच्या कारकिर्दीनंतरहि शक्य होत नाहीं. ही चूक श्रोत्यांची कीं आकाशवाणीची ?

इंग्रजी कार्यक्रमासाठीं सोइस्कर वेळेपैकीं मुंबईहून आणि दिल्लीहून दर रोज किती वेळ नित्य नेमानें खर्च होतो ? इंग्रजी भाषणें-संवाद होतात. तितके तरी प्रत्येक भाषेच्या वाटणीस ( मुंबईहून ) येतात काय ? इंग्रजीला मुंबईत इतकें प्राधान्य असावें आणि मराठीला एवढें गौणस्थान लाभावें. ही सुद्धां एक लहरच नव्हे काय ?

आजपर्यंत झालेल्या अनेक भाषणांचा उपयोग कांहीं न करतां–कोठारांत तीं नुसतीं दडपून ठेवून काय फायदा ? सध्यां नवशिक्षितांना, प्रौढांना वाचनीय पुस्तकें नाहींत म्हणून मागणी वाढत आहे-लेखक शिकवून तयार करण्याचें कारखानें निघत आहेत. आणि हें साहित्य नुसतें पडून आहे !!

हीहि एक अजब लहर होय.

अशा अनेक लहरी नाहींशा होतील तो सुदिन समजूं.

# " माझा विरंगुळा "

## मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांचें ६, जून १९६१ चें नभोवाणीवरील भाषण

" माझा विरंगुळा " या विषयावर बोलतांना आज माझ्या आयुष्यांतील अनेक आठवणींची साखळी माझ्या नजरेसमोर येत आहे. योगायोगानें म्हणा अगर स्वतःच्या आवडीनिवडीप्रमाणें व प्रयत्नानें प्रत्येक माणसानें स्वतःचें कार्यक्षेत्र निवडलेलें असतें व त्यामध्यें त्याला त्याचें सबंध आयुष्य व्यतीत करावयाचें असतें. हें करीत असतांना प्रत्येकाला स्वतःचा असा एक विरंगुळा म्हणून असतोच. कारण जीवनाच्या रोजच्या धकाधकीतून त्याला जे कांहीं विसाव्याचे क्षण मिळतात त्यावेळीं हा विरंगुळा त्याला जीवनांतील उच्च प्रतीचा आनंद मिळवून देत असतो. याचमुळें मी जेव्हां माझ्या जीवनाकडे दृष्टिक्षेप टाकतों त्यावेळीं प्रथम जर माझ्या मनासमोर कोणतें चित्र उभें राहत असेल तर मी ज्या ठिकाणी वाढलों, खेळलों व माझें व्यक्तिमत्त्व ज्या ठिकाणीं घडलें त्या माझ्या कराड गावांचें. माझ्या पाठीमागच्या सर्व व्यापांतून थोडी सवड काढून कराडला प्रीतिसंगमाच्या कांठावर कांहीं काळ निवांतपणें घालवावा अशी वारंवार इच्छा माझ्या मनांत येते. सुदैवानें नुकतीच बऱ्याच वर्षांनी मला तशी संधि मिळाली व या संधीचा मी फायदा घेऊन कराडच्या प्रीतिसंगमावर थोडावेळ जाऊन आलों. या वेळीं भूतकाळांतील हृद्य आठवणींनी माझें मन भरून आलें. माझ्या गतजीवनाचा चित्रपट झरझर माझ्या डोळ्यासमोर येऊन गेला. माझी आई, माझे बंधु व इतर कुटुंबीय मंडळी या सर्वांच्या प्रेमळ सहवासांत घालविलेले सर्व दिवस आठवले व त्यांच्या सहवासांत मिळालेला अपूर्व आनंद यांच्या गोड स्मृति माझ्या हृदयाला स्पर्श करून गेल्या. मी कितीहि थकलों तरी घरांतील आणि कुटुंबांतील प्रेमळ आणि निर्मळ वातावरणाने माझें मन उल्हसित होतें. देवघरांतील नंदादीपाच्या मंद प्रकाशामध्यें भाविकाच्या मनांत ज्या सुखद लहरी उठतात त्याचें वर्णन नुसत्या शब्दानें कसें करणार ? भावनेची भाषा भावनेलाच समजते. माझ्या कुटुंबांतील मंडळीमध्यें बसून हास्य-विनोद करून, गप्पा गोष्टींत वेळ घालविण्यांत केवढा आनंद वाटतो. माझ्या कुटुंबांतील मंडळींबरोबर कांहीं काळ घालविणें हा एक माझा आवडता विरंगुळा आहे.

माणसाला अनेक प्रकारें विरंगुळा मिळूं शकतो. किंबहुना एखाद्याला कशापासून विरंगुळा लाभतो हें ज्याच्या त्याच्या आवडीनिवडीवर व व्यक्तिमत्त्वावर अवलंबून असतें. कारण यावरून मनुष्याच्या व्यक्तिमत्त्वाचे निरनिराळे पैलू आपणांस दिसून येतात. त्यांतल्या त्यांत माझ्यासारख्याने राजकारणांत प्रत्यक्ष जबाबदारीचें काम करणारी एक व्यक्ति या नात्यानें अशा तऱ्हेचें निवेदन करणें ही गोष्ट फार कठीण आहे. स्वतःकडे तिऱ्हाइताच्या दृष्टीनें पहाणें हें सांगायला जेवढें सोपें आहे तेवढें अंमलांत आणायला अवघड आहे. पण ही गंमतीदार कसरत करण्याचा प्रयोग मी आज करणार आहे. इंग्रजींत ज्याला लाऊड थिंकिंग म्हणतात तशा प्रकारचेंच हें माझें चिंतन आहे. लहानपणीं शाळेंत असतांना किंवा तरुणपणीं राजकीय चळवळींत भाग घेतांना मला कधी कधी काव्यकल्पना सुचत आणि त्या मी कागदावर देखील त्यावेळी उतरीत होतों. अगदीं कॉलेजांत असल्यापासून काव्य आणि साहित्य याचें मला फार मोठें आकर्षण वाटत असे आणि आज देखील वेळांत वेळ काढून साहित्याची गोडी मी घेतों आणि त्यामुळें मला मनमुराद आनंद मिळतो. मराठीमधील कादंबरीकारांत श्री. खांडेकरांचें मानवताप्रधान कादंबरीलेखन किंवा श्री. फडके यांच्या प्रणयप्रधान कथा मी अनेकवेळा अतिशय उत्सुकतेने वाचल्या आहेत आणि त्याचा आनंद लुटला आहे. संत ज्ञानेश्वरांच्या वाङ्मयांतील गोडवाहि मी अतिशय भाविक मनाने चाखला आहे. त्या वाङ्मयांतील काव्य म्हणजे मराठी भाषेचा महान् ठेवा होय. कित्येक वेळेला साहित्यिकांच्या शब्दांतील सामर्थ्य पाहून आपलें मन

थक्क होतें. त्यांच्या शब्दांचें सामर्थ्य अफाट असतें. मॅक्झिम गोर्की यांची "आई" ही कादंबरी मी ज्या वेळीं प्रथम वाचली त्यावेळीं माझ्या हृदयांत अतिशय कालवाकालव झाली. असें कांहीं अक्षर वाङ्मय वाचलें कीं आपण आपलें स्वत्व क्षणभर बाजूला ठेवतों आणि सुखाच्या निवान्त क्षणांत रममाण होतों.

वेरूळ येथील कैलास लेणीं ज्या वेळीं मी प्रथम पाहिलीं त्यावेळच्या माझ्या भावना मला आठवतात. तीं कैलास लेणीं पाहून माझें मन भारावून गेलें. आजूबाजूला जे कोणी लोक मला त्याची माहिती देत होते त्यांचें अस्तित्व देखील मी क्षणभर विसरून गेलों. माझें 'मी-पण' विसरलों आणि किंचित् काल एका अनन्यभूत आनंदात रममाण झालों. मला वाटतें, आजकालच्या धकाधकीच्या जीवनांत व्यक्तीच्या आयुष्यांत असा क्षण येणें म्हणजे त्याला लाभणारा खरा विरंगुळा होय. असा विरंगुळा प्रत्येकाच्या जीवनांमध्यें जितका जास्त येईल तितकें त्याचें जीवन अधिक सुखी बनेल. श्रेष्ठ कलाकृतिमध्यें जीवन फुलविण्याची अशी अमर्याद शक्ति असते.

साहित्याची गोडी आपण एकांतात चाखतों. पण समाजांत प्रत्यक्ष लोकांच्यामध्यें बसून नाटकें पहाणें, लोकनाट्याची मौज लुटणें, कुस्त्यांची रणधुमाळी अवलोकणें किंवा क्रिकेटची टेस्ट मॅच पहाण्यांत दंग होणें यांतली मौज कांही औरच आहे. एकाद्या जुन्या नाटकांतील पडदा वर जाऊन पेटीचे सुमधुर स्वर वातावरणांत घुमूं लागले किंवा सारंगीचे मृदु सूर कानीं पडले कीं, एका निराळ्याच जगांत आपण प्रवेश करतों. त्यावेळीं आपल्या भावना कशा दोलायमान होतात त्याचें वर्णन शब्दांनी करतां येणार नाहीं. बालगंधर्वांचीं तीं जुनीं गाणीं किंवा त्यांच्या काळांतील नटश्रेष्ठांच्या अभिनय कौशल्याच्या नुसत्या आठवणींनेंच गोड स्मृति चाळविल्या जातात. केशवराव दाते यांच्यासारख्या कसलेल्या नटांच्या भूमिका आणि जुन्या काळांतील तीं भरदार नाटकें यांच्या आठवणीदेखील किती सुखद वाटतात. रसिक समुदायामध्यें बसून नाटकाची गोडी चाखणें किंवा तमाशांच्या फडांची मौज लुटणें अशा कितीतरी जीवनांतल्या गोष्टी आहेत कीं, त्यापासून मी अक्षरशः मनसोक्त आनंद लुटला आहे. बडे गुलामअल्लीखां, भीमसेन जोशी, हिराबाई बडोदेकर ह्यांच्यासारख्या सुप्रसिद्ध कलाकारांचें गायन म्हणजे जीवनांतील आनंदाचा उच्चांक होय.

साहित्य, संगीत, नाट्य, चित्रकला ह्यासारख्या कलांनी माणसांच्या जीवनाला समृद्धि आणलेली आहे. मानवाला सुसंस्कृत बनविलें आहे. कारण त्याला ह्या कलांचा रस चाखतां येतो आणि एखादि व्यक्ति साक्षर असूनदेखील सुसंस्कृत नसते. कारण जीवनांतील आनंद कसा लुटावा हें त्याला ठाऊक नसतें. कलेचें रहस्य जाणण्याची त्याला दृष्टि प्राप्त झालेली नसते. त्यामुळें जीवनांत त्याचें मन कोठेंच रमत नाहीं. त्याला कशापासून देखील विरंगुळा वाटत नाहीं. अशा प्रवृत्तिपासून आपण जपलें पाहिजे. माझ्या जीवनाकडे मी जेव्हां दृष्टिक्षेप टाकतों त्यावेळीं सुदैवानें मला जीवन आनंदमय वाटतें व नव्या क्षितिजांच्या ओढीने माझें मन अद्यापहि भारावून जातें.

मी क्षणभर विचार केला तर मला वाटतें कीं कितीतरी गोष्टी करायच्या राहून गेल्यात. मला पोहायची खूप हौस आहे. पण वेळ कुठें मिळतो ? गायन किंवा नाट्य ह्यांची देखील कमी गोडी नाहीं. मित्रांशी गप्पागोष्टी करतांना कधीं ...... कधीं रंग भरतो. पण कामाच्या व्यापामुळें आणि सार्वजनिक जीवनाच्या बंधनापुढें काय करणार ? एखादें चांगलें नाटक पहावें म्हणून ठरवतो पण ऐनवेळीं दुसराच कार्यक्रम उपस्थित होतो. एकादी संध्याकाळ मित्राबरोबर सुखसंवाद करण्यांत घालवावी म्हणून बेत आखतो. पण मध्येंच दुसरें कांहीं प्रकरण उद्भवतें. त्यामुळें हे जे सुखाचे क्षण मनांत योजलेले असतात ते दूर जातात. थोडासा विरंगुळा वाटावा म्हणून कांही गोष्टी करायच्या ठरविलेल्या असतात. त्या तशाच राहतात आणि विश्रांतीचे क्षण दैनंदिन कामांतच विलीन होऊन जातात.

कांहीं विषयांचा तपशीलवार अभ्यास करावा म्हणून त्या विषयावरील महत्त्वाचीं पुस्तकें मी जमा करीत असतों. अशा पुस्तकांची संख्या दिवसेंदिवस वाढत चालली आहे. हीं सर्व पुस्तकें आवडीनें मी माझ्या झोपण्याच्या खोलींत ठेवलीं आहेत. कित्येक महिने झाले या पुस्तकांना माझा हातच लागत नाहीं, वेळच मिळत नाहीं. कांहीं थोडा वेळ मिळालाच तर

पुस्तकाच्या त्या छोट्या शेल्फपुढें बसून पुस्तकांचीं पानें चाळावींत व तीं कोणत्या क्रमानें वाचावींत यांचा कार्यक्रम मनाशी योजीत बसणें एवढाच विरंगुळा हल्ली मला राहिला आहे.

तथापि, माणसानें आपल्या जीवनांतील वास्तवता लक्षांत घ्यायला हवीच. निव्वळ स्वप्नसृष्टींत कांही आपण वावरूं शकत नाहीं. ध्येयवादी वृत्तीनें कार्य करीत असतांना स्वप्नाळु श्रद्धा उपयोगी पडत नाहीं. जीवनांतील कटु सत्यावर प्रकाश टाकणाऱ्या व वास्तवतेची झळ कमी करणाऱ्या हास्यरसाची जोड त्याला हवीच. गंभीर गोष्टीकडे सुद्धा कांहींशा स्मित वदनानें पाहण्याएवढा सोशिकपणा यायला हवा. रोजच्या व्यवहारांत अशा वृत्तीनें जर आपण काम करूं शकलों तर प्रत्येक क्षणाक्षणाला आपल्याला जीवनाचा आनंद लुटतां येईल. विख्यात लेखक लिन युतांग ह्यानें मानवी मनाचें रहस्य सांगितलें आहे. तो म्हणतो, "जीवनांतील वास्तवता ध्यानांत घेऊन ध्येयवादी प्रवृत्तीनें कार्य करणारा व येणाऱ्या अडचणींना हंसत हंसत तोंड देणारा गृहस्थ म्हणजेच खरा ज्ञानी होय. रीॲलिटी, ड्रीम्स, व ह्युमर ह्या तीन प्रवृत्तींचें एकत्र मिश्रण म्हणजेच विज्डम - ज्ञान होय" असें त्यानें जीवनाचें गणित मांडलें आहे. हें गणित संपूर्ण बरोबर आहे कीं नाही हें मी नाहीं सांगूं शकणार, पण मला वाटतें त्यांत पुष्कळसा अर्थ आहे.

कांही तरी नवें शोधावें व जें सांपडलें त्यांत रस घ्यावा अशा प्रवृत्तीनें आपण जीवन जगलों तरच तें जगणें म्हणावयाचें. "ह्यांत काय आहे ? त्यांत काय आहे ?" अशा तुसड्या वृत्तीनें आपण जर प्रत्येक क्षण वाया घालविला तर जीवनाच्या लपंडावाचा डाव हरलाच म्हणून समजावयाला हरकत नाही. जीवनांत जे सुखाचे क्षण येतात ते सूर्याच्या कोवळ्या किरणासारखे सोनेरी नि सतेज असतात. ते क्षणभर राहतात नि मग कडक होतात. ज्यावेळी हे किरण कोवळे दिसतात त्यावेळी त्यांचें तें तेज, तें रम्य स्वरूप पाहून आल्हाद वाटतो, मनाला गंमत वाटते. नदीच्या खोल डोहांत दगड टाकला कीं गोल गोल आकार पाण्यावर उठतात. तरंग उठतात, मजा वाटते पहाणाऱ्याला. जंगलाच्या वाटेनें जातां जातां उन्हाच्या वेळीं एखादा झरा दिसावा, तेथील पाणी पितांना केवढा आनंद होतो. एवढेंच कशाला, ओढ्याच्या कांठीं भरगच्च जांभळांनें भरलेल्या झाडाचीं चार जांभळें तोंडांत टाकलीं कीं किती गोड लागतात तीं ! दुकानांतून विकत आणलेल्या जांभळाला त्या गोडीची सर थोडीच येणार ! जीवनामधील आनंदाचे क्षण हे असे असतात.

जुन्यापासून बोध आणि नव्याचा शोध घेत घेत जाणारा हा जीवनप्रवाह आहे. ह्या प्रवाहांत प्रवाहपतित न बनतां सुजाणपणें मार्ग आक्रमित जाणें व जगण्याचा आनंद लुटणें हा एक छोटासा आदर्श माझ्यापुढें आहे. हा माझा विरंगुळा होय.

---

श्री. नी. र. वऱ्हाडपाण्डे

# कपोलकल्पित आर्य आणि त्यांच्या स्वाऱ्या

"Max Muller... on an unlucky day used the words "Aryan race" ... .. thus there arose, truly out of talk alone, an imaginary creature, Aryan Man......"

Heredity, Race & Society
by
Dunn & Dobzhansky

"For the Indo-Aryan invasion of India no direct evidence is available."

"...in the text of the Ṛgved itself although historical allusions are not uncommon, there is no reference anywhere to the fact of the migration, nor any definite indication that it was still remembered."

The Sanskrit Language
by Prof. T. Burrow

भारताचा इतिहास म्हणजे परकीयांच्या यशस्वी स्वाऱ्यांचा इतिहास व भारताची संस्कृति म्हणजे निरनिराळ्या काळीं आलेल्या निरनिराळ्या विजेत्यांच्या संस्कृतींचें एक कडबोळें असा दृष्टिकोन गेल्या दीडशें वर्षांत आपल्या देशांत बळावलेला आहे. हा दृष्टिकोन राष्ट्राच्या अस्मितेला घातक आहे, म्हणून तो कितपत सत्यावर आधारलेला आहे याची कसोशीनें चिकित्सा होणें आवश्यक आहे.

ही चिकित्सा आम्ही कोण व कुठून आलों या प्रश्नापासूनच सुरू केली पाहिजे. कारण आम्हांला शिकवण्यांत येणाऱ्या इतिहासाचा पहिला पाठ असा कीं आम्ही या भरतभूमींत उंदराच्या बिळांत राहणाऱ्या नागाप्रमाणें उपरे आहोंत. "आर्य" नांवाच्या वंशाचे भारताच्या "मूळ" रहिवाशांहून संस्कृतीनें वेगळे असे लोक फार प्राचीन काळीं भारतावर स्वारी करून आले, त्यांनीं इथल्या "मूळ" वंशाचा व संस्कृतीचा उच्छेद केला व उरल्यासुरल्यांना आत्मसात् करून घेतलें. आम्ही जे निर्माण झालों ते या रासायनिक प्रक्रियेंतूनच, अशी आमची कुळकथा नेहमीं सांगण्यांत येते. या कुळकथेला कितपत आधार आहे याचा येथें विचार करण्याचें योजलें आहे

## आर्यतेचें लक्षण काय ?

असा विचार करतांना सुरवातीसच असा प्रश्न उपस्थित होतो, कीं "आर्य" या नांवाचा वंश खरोखरच पूर्वी कधींतरी अस्तित्वांत होता, याला कांहीं प्रमाण आहे काय ? असें प्रमाण शोधतांना आज अस्तित्वांत असलेल्या मानवांचें वंशदृष्ट्या वर्गीकरण कसें होतें याचा विचार केला पाहिजे.

वंशांचें वर्गीकरण साधारणपणें त्वचेचा वर्ण, डोळयांचा वर्ण, नाकाचा आकार, केसांचा वर्ण, व सरल-कुरलता इत्यादि आनुवंशिक विशेषांवरून करण्यांत येतें. गोरा, सरळ नाकाचा, बारीक ओठांचा व सरळ केसांचा तो आर्य; व काळा, जाड ओठांचा व कुरळ्या केसांचा तो निग्रो असें वर्गीकरण केलें जातें. पण गोऱ्या माणसाचे केस किंवा नाक सरळ असलेंच पाहिजे असा कांहीं जननशास्त्राचा नियम नाहीं. तसेंच काळ्या माणसाचे ओठ जाड व केस कुरळे असलेच पाहिजेत असेंहि नाहीं. हे सर्व विशेष कांहीं प्रमाणांत आनुवंशिक असले, तरी स्वतंत्र आहेत. वर्ण, केस व नाक यांचा आकार इत्यादि स्वतंत्र गुणधर्मांचा एकत्र विचार करून असा वर्ण व असें नाक असलेला तो आर्य असें वर्गीकरण करणें अगदींच स्वच्छन्दीपणाचें आहे. गोरा रंग व बारीक ओठ यांच्या आधारें जर युरोपीय लोकांना एका वंशांत घातलें, तर कुरळे केस व सरळ नाक यांच्या आधारें कांहीं सेमेटिक व कांहीं निग्रो यांचा मिळून एक वंश कां कल्पूं नये ? तसेंच ठेंगणेपणा व बारीक ओठ या बाबतींतील साम्यामुळें मद्रासी व चिनी यांचा समान वंश कां मानूं नये ?





अनुक्रमणिका

शिवाय आनुवंशिक विशेषांचा विचार करतांना फक्त चेहऱ्याचाच विचार कां करावा ? चेहऱ्याऐवजीं पायांचा वा छातीचा विचार केला तर वंशवाद्यांचीं सर्वच वर्गीकरणें अस्ताव्यस्त होण्याचा संभव आहे.

बाह्य शरीरविशेषांच्या आधारें कोणत्याहि दोन मानवसमूहांचा एक वंश कल्पितां येतो, यावरून वंश-वाद निराधार ठरतो; त्याचप्रमाणें शरीरविशेषापेक्षां अधिक महत्त्वाच्या असलेल्या रक्ताच्या गुणविशेषांचा विचार केला, तरी अखिल मानवजात हा एकच वंश आहे असें मानावें लागतें. रक्तक्षयावर उपचार करतांना वाटेल त्या माणसाचें रक्त वाटेल त्या माणसाला देतां येत नाहीं. रोग्याचें रक्त रक्तदात्याच्या रक्ताशीं जुळतें कीं नाहीं, हें आधीं पहावें लागतें. नाहींतर न जुळणारें रक्त अंगांत गेल्यामुळें रोग्याचा मृत्यु देखील होण्याचा सम्भव असतो. रक्तसंक्रान्तिसंबंधींच्या या अनुभवावरून मानवीरक्ताच्या 'ओ', 'अ', 'ब' व 'अब' अशा चार जाति पडतात, असें कार्ल लँडस्टीनर या शास्त्रज्ञानें सिद्ध केलें आहे. 'ओ' जातीचें रक्त कुणालाहि चालतें. उलट 'अब' जातीच्या रक्तांत कोणतेंहि रक्त सामावून जाऊं शकतें. पण एरवीं एका जातीच्या रक्ताला दुसऱ्या जातीचें रक्त चालत नाहीं.

## वंशभेद काल्पनिक आहेत

जगांतच्या निरनिराळ्या देशांतील लोकांचें रक्त तपासून पहातां एखाद्या तथाकथित वंशांतील लोकांचें रक्त 'ओ' जातीचें असतें व दुसऱ्या तथाकथित वंशांतील लोकांचें रक्त 'अब' जातीचें असतें असें मुळींच आढळत नाहीं. युरोपीय "आर्य" असोत कीं आफ्रिकेंतले निग्रो असोत, चीनमधले "मंगोल" असोत कीं मद्रासमधले 'द्रविड" असोत, सगळ्या लोकांत 'ओ', 'अ', 'ब' व 'अब' या चारहि प्रकारच्या रक्ताचे लोक सांपडतात. सर्वच लोकांत 'ओ' व 'अ' रक्ताच्या लोकांचें प्रमाण 'ब' व 'अब' रक्ताच्या लोकांपेक्षां जास्त असतें. तेव्हां 'आर्य" रक्त व "अनार्य" रक्त असें रक्ताचें वर्गीकरण करतां येत नाहीं.

आज सर्व लोकांत सर्व तऱ्हेचें रक्त सांपडतें, कारण "शुद्ध" वंश अस्तित्वांत राहिले नाहींत. हजारों वर्षें आन्तरवंशीय विवाह झाल्यामुळें वंशसंकर झालेला आहे. पण पूर्वी कधींकाळीं तरी शुद्ध वंश असले पाहिजेत, असा एक वंशवाद्यांचा आग्रह आहे. रक्ताच्या बाबतींत हा आग्रह किती निराधार आहे हें प्रत्यक्ष प्रमाणानें दाखवून देतां येत नाहीं. पण शरीराच्या आकारविशेषांच्या बाबतींत भूमीच्या उदरांत हजारों वर्षांपूर्वीं पुरल्या गेलेल्या सांगाड्यांचें परीक्षण करणें शक्य आहे. असें परीक्षण केलें असतां आजच्याप्रमाणेंच फार प्राचीन काळीं देखील शरीरविशेषांचें अनेकविध संयोजन आढळत होतें, शुद्ध वंशाचें द्योतक असें कांहीं वेगळ्या प्रकारचें संयोजन त्यावेळीं नव्हतें, असें निःशंकपणें म्हणतां येतें.

तेव्हां जननशास्त्राच्या दृष्टीनें "आर्य या नांवाचा वंश कधीकाळीं अस्तित्वांत होता हीच मुळांत एक गप्प ठरते.

## सुईच्या टोकावरील भव्य इमारत

यावर आर्यांच्या स्वाऱ्यांची कथा सांगणारे लोक म्हणतील, कीं "आम्ही वंश हा शब्द जननशास्त्राच्या आधारें वापरीत नाहीं. इंग्रज जसे भारताच्या बाहेरून आले तसेच आर्य नांवाचे कांहीं लोक भारताच्या बाहेरून आले. त्यांची संस्कृति भारताच्या मूळ रहिवाशांच्या संस्कृतीहून भिन्न होती. संस्कृतीमध्यें आम्ही मुख्यतः भाषेचा समावेश करतों. संस्कृत व संस्कृतोद्भव भारतीय भाषा आणि ग्रीक, लॅटिन इत्यादि प्राचीन व इंग्रजी, जर्मन इत्यादि आधुनिक युरोपीय भाषा यांच्यांत इतकें साम्य आहे, कीं हें साम्य यदृच्छया उद्भवलें असेल हें शक्य नाहीं. या साम्याचें कारण या भाषा कोणत्यातरी एका मूळ भाषेंतून उद्भवल्या, हेंच असलें पाहिजे. या मूळ भाषेला आम्ही इण्डोयुरोपीय असें नांव देतों. ही मूळ भाषा आज अस्तित्वांत नाहीं. पण वर उल्लेखिलेल्या भाषांतील साम्यांच्या आधारें या मूळ भाषेचें स्वरूप कल्पितां येणें शक्य आहे. ही मूळ भाषा बोलणारे लोक म्हणजे आर्य. हे आर्य युरोपांतच राहात असले पाहिजेत. कारण इंडोयुरोपीय भाषांतल्या पुष्कळशा भाषा युरोपांतच सांपडतात. शिवाय या मूळ भाषेशीं सगळ्यांत जुळणारी भाषा संस्कृत ही नसून लिथुआनिअन ही आहे. तेव्हां इंडोयुरोपीय भाषा बोलणारे आर्य लोक युरोपांतूनच सध्यां जेथें जेथें इंडोयुरोपीय भाषा बोलल्या जातात तेथें पसरले असले पाहिजेत."








लहानपणापासून " आर्यांच्या स्वाऱ्या ' म्हणून शाळांतल्या इतिहासांतून देखील शिकवल्या जाणाऱ्या वृत्तान्ताची गगनचुम्बी इमारत सुईच्या अग्राएवढ्या या आधारावर उभी आहे ! " आर्य " लोक अमुक ठिकाणावरून आले, त्यांची पहिली टोळी " अ " मार्गानें आली व दुसरी टोळी " ब " मार्गानें आली, पुढें " क " मार्गावर त्यांचा मिलाफ झाला " वगैरे खडान् खडा माहिती वाचून माझ्यासारख्या भोळ्या वाचकाला आजपर्यंत असें वाटत असे कीं कुणींतरी या सर्व घटना डोळ्यानें पाहून लिहून ठेवल्या आहेत व या प्राचीन लेखाच्या आधारेंच आमचे इतिहास लिहिले गेले आहेत. समकालीन लेखांचा ज्याला आधार नाहीं तो इतिहास नव्हे, असें सर्वसाधारणपणें समजलें जातें. पण हा नियम फक्त भारतांत रूढ असलेल्या पौराणिक परंपरांनाच लागू आहे, युरोपीय संशोधकांच्या नव-पुराणांना लागू नाहीं असा अलिखित संकेत मोठ-मोठ्या इतिहासकारांनीं मानलेला दिसतो.

## इंग्रजांचें मूलस्थान : अमेरिका

बरें, आर्यांच्या स्वारीला समकालीन लेखांचा पुरावा नसला तरी तत्प्रतिपादक युक्तिवाद तरी सयुक्तिक व सुसङ्गत आहे काय ? मुळींच नाहीं. इंडोयुरोपीय भाषांची बहुसंख्या जिथें आहे, तिथून आर्य आले हा स्वतःचाच दण्डक देखील भाषावादी संशोधक पाळायला तयार नाहींत. या दण्डकाप्रमाणें आर्य लोक युरोपांतून आले असें मानायला पाहिजे. पण याबाबतींतहि या संशोधकांचें एकमत नाहीं. कुणी म्हणतो, आर्य लोक पामीरच्या पठारावरून आले; कुणी म्हणतो, तुर्कस्थानांतून आले; तर कुणी म्हणतो, आइसलँडमधून आले ! शिवाय आर्य लोक भारतांतूनच बाहेर पसरले या मताविरुद्ध रामबाण युक्तिवाद म्हणून इंडोयुरोपीय भाषांतली सगळ्यांत प्राचीन भाषा लिथुआनियन आहे, संस्कृत नव्हे, असें उच्चरवानें सांगणारे भाषा-कोविद् आर्य लोक लिथुआनियांतून बाहेर पसरले असें मानायला मात्र तयार नाहींत !

वस्तुतः इंडोयुरोपीय भाषांची बहुसंख्या जिथें आहे, तेच इंडोयुरोपीय या काल्पनिक भाषेचें मूलस्थान हा युक्तिवादच भ्रान्त आहे. अशा युक्तिवादाच्या आधारें इंग्रजी भाषेच्या बोली जेथें बहुसंख्येनें आढळतात तेंच इंग्रजी भाषेचें मूलस्थान, असें म्हणून इंग्रज लोक अमेरिकेंतून वा ऑस्ट्रेलियांतून इंग्लंडांत आले असें सिद्ध करणें जड जाणार नाहीं !

भाषांचें इंडोयुरोपीय, द्राविड वगैरे वर्गीकरण बरोबर आहे असें गृहीत धरून आतांपर्यन्तचें विवेचन केलें आहे. पण हें वर्गीकरणच मुळांत बरोबर आहे कीं नाहीं, याचाहि विचार झाला पाहिजे. कोणत्याहि दोन वस्तूंत साम्य व भेद हीं दोन्ही असतात. त्यांतल्या साम्यावर भर देऊन त्या वस्तूंना एका वर्गांत टाकतां येतें, तसेंच भेदावर भर देऊन वेगळ्या वर्गांत देखील टाकतां येतें. पितृ, मातृ, father, mother वगैरे शब्दांच्या साम्यावरूनच मुख्यतः संस्कृत व प्रमुख युरोपीय भाषा यांना एका वर्गांत टाकण्यांत आलें आहे. पण संस्कृत भाषा या बाबतींत इंग्रजीसारखी असली तर कांहीं बाबतींत तथाकथित द्राविड भाषांसारखी देखील आहे. इंडोयुरोपीय भाषांत संस्कृतच्या मानानें मूर्धन्य उच्चार कमी आहेत. या बाबतींत संस्कृत व द्राविड भाषा यांचें साम्य अधिक आहे. मग एका बाबतींत संस्कृत इंग्रजीसारखी म्हणून दोघींची जातकुळी एक मानायची तर कांहीं बाबतींत ती तामिळसारखी म्हणून संस्कृत व तामिळ यांची जातकुळी देखील एक कां मानूं नये ?

## अगा जें झालेंचि नाहीं

संस्कृतप्रमाणेंच चिनी तुर्कस्थानांतील तोचानी बोलींचा अन्तर्भाव देखील इंडोयुरोपिअन भाषांतच करतात. पण या बोली इतर इंडोयुरोपीय भाषांपेक्षां इतक्या वेगळ्या आहेत, कीं त्या वेगळ्या कां आहेत हें सांगायची युरोपीय संशोधकांना जरूर वाटते. हें कारण त्या भाषा हजारों-वर्षांपूर्वी प्रागैतिहासिक काळीं आपल्या मूल स्थानापासून दूर झाल्या, याशिवाय दुसरें असूं शकत नाहीं असा प्रा. बरो यांचा आग्रह आहे. पण हा शुद्ध द्राविडी प्राणायाम आहे. एखादी भाषा स्वयंकल्पित इंडोयुरोपिअन सांच्यात बसत असेल, तर ती इंडोयुरोपीय भाषा नाहीं किंवा इंडोयुरोपीय ही वर्गीकरणपद्धतीच चुकीची आहे, असें सरळ अनुमान काढायला पाहिजे. हें सोडून एखाद्या भाषेच्या गैर इंडोयुरोपीय लक्षणांची उपपत्ति लावायला ज्याबद्दल कोणताहि तत्कालीन पुरावा मिळूं शकत





अनुक्रमणिका

नाहीं, अशा कपोलकल्पित देशान्तराकडे बोट दाखवणें हास्यास्पद आहे.

भाषांच्या वर्गीकरणांवरून प्राचीन कालांतील देशांतराबद्दल अनुमानें बांधायचीं तर इंग्रज लोक चीनमधून इंग्लंडांत आले असें अनुमान बांधतां येईल; कारण चिनी व इंग्रजी या दोन्ही स्थानप्रधान भाषा आहेत. म्हणजे या दोन्ही भाषांत शब्द वाक्यांत कोणत्या ठिकाणीं आहे, यावर तो कर्ता कीं कर्म इत्यादि गोष्टी अवलंबून असतात. तसेंच तामिलभाषी लोक कोरियांतून आले असेंहि अनुमान बांधतां येईल; कारण तामिळ व कोरियन या दोन्ही पदप्रधान भाषा आहेत : म्हणजे अविकारी धातूला संबंधबोधक प्रत्यय लावून तयार झालेल्या पदांनीं या भाषांत विचार व्यक्तविले जातात.

भाषासाम्यावर आधारलेल्या अशा युक्तिवादांवर ज्यांचा सर्वस्वी भरंवसा आहे, असे संशोधक आर्यांच्या स्वारीला यापेक्षां आणखी कोणताहि पुरावा नाहीं, असें प्रांजलपणें कबूल करतात. ऋग्वेदामध्यें आर्यांच्या स्वारीचा मागमूसहि नाहीं, असें प्रा. बरो यांचें मत लेखाच्या शिरोभागीं उद्धृत केलेंच आहे. पण भारताचा सर्वांत प्राचीन ग्रन्थ जो ऋग्वेद व संशोधनानें उजेडांत आणलेले अतिप्राचीन काळचे मोहेंजोदारो, हरप्पा इत्यादि ठिकाणचे अवशेष यांत आर्यांच्या स्वारीचा मागमूसही सांपडत नसेल, तर ती खरोखरच झाली होती असें मानणें "बाळयानें निबंध लिहिला होता, पण कोणतें तरी अज्ञात रसायन त्यावर साण्डल्यामुळें तो पूर्णपणें पुसला गेला व वहीचीं पानें पूर्वींसारखींच कोरीं राहिलीं", असें अभ्यासचुकार बाळयाच्या प्रेमळ बापानें मानण्याइतकेंच सयुक्तिक ठरेल, अशी रुखरुख अनेक संशोधकांना लागून राहिलेली आहे. म्हणून प्राचीन लेख व अवशेष यांत आर्यांच्या स्वारीचीं पदचिह्नें शोधण्याचा त्यांचा अविरत प्रयत्न सुरूं आहे. या प्रयत्नांतून निष्पन्न झालेल्या कांहीं मुक्ताफळांची परीक्षा केली पाहिजे.

## बिभेत्यल्पश्रुताद्वेदः

वैदिक आर्यांनीं आपल्या शत्रूंचें "अयज्वे", "शिस्नदेव" व "पिशङ्गभृष्टि" इत्यादि शब्दांनीं वर्णन केलें आहे. या वर्णनांत यज्ञ करणारे, गोरे परकीय "आर्य" व लिङ्गपूजा करणारे, काळे "आदिवासी" यांच्या संघर्षाचें दर्शन युरोपीय पंडितांना होतें. पण आर्यांच्या स्वारीच्या कल्पनेनें आधी पछाडल्याशिवाय असें दर्शन होणें शक्य नाहीं. पिशङ्गभृष्टि म्हणजे काळे व शिस्नदेव म्हणजे लिङ्गपूजक, हे अर्थ खरे मानले तरी हे काळे व लिङ्गपूजक लोक भारतांतले मूळचे रहिवासी होते व यज्ञ करणारे गोरे आर्य हे भारताच्या बाहेरून आले होते, असें त्यावरून कसें सिद्ध होईल ? एकाच देशांत कांहीं लोक काळे व कांहीं गोरे, कांहीं यज्ञ करणारे व कांहीं लिङ्गपूजा करणारे असूं शकत नाहींत काय ?

शिवाय "शिस्नदेव" व पिशङ्गभृष्टि" या शब्दांचे "लिङ्गपूजक" व "काळे" हे अर्थसुद्धां संशयास्पद आहेत. "शिस्नदेव" या शब्दाचा अर्थ कामुक असा देखील असूं शकेल, कारण शिव ही देवता वेदांत देखील आहे व शिवोपासकांची निन्दा करण्याच्या बुद्धीनें वेदांत "शिस्नदेव" असा शब्द येईल हें सम्भवत नाहीं.

"शिव ही देवता मूळ आर्यांची नव्हती. मोहेंजोदारोंतील "द्रविडां"ची होती. मोहेंजोदारोमध्यें सांपडलेल्या एका धातुपत्रावर शिवाची आकृति आहे. या शिवालाच वेदांनीं रुद्र बनविलें. वैदिक देवतांमध्यें फक्त रुद्र हा एकच देव असा आहे, कीं ज्याची उपासकाला भीति वाटते. त्याच्याबद्दल प्रेम वाटत नाहीं. अर्थात् वैदिक "आर्यांनीं" हा देव, आपले शत्रु जे मोहेंजोदारो मधील "अनार्य", त्यांच्याकडून स्वीकारला असला पाहिजे" – असा डॉ. घोष यांचा याविरुद्ध युक्तिवाद आहे.

तर्कशास्त्राचें उत्कृष्ट विडंबन म्हणून या युक्तिवादाचें उदाहरण देतां येण्यासारखें आहे. मोहेंजोदारोंत जर वैदिक देवता सांपडतात, तर मोहेंजोदारोची व वेदांची धार्मिक संस्कृति एकच होती, असें सरळ अनुमान त्यावरून निघतें मोहेंजोदारोची संस्कृति अवैदिक होती असें स्वतंत्र प्रमाणांनीं आधीं सिद्ध केल्याशिवाय वरील तर्कटांना आधारच उरत नाहीं. वैदिक आर्यांना रुद्राची भीति वाटत होती यावरून रुद्र हा त्यांचा देव नव्हे, असें म्हणायला मोहेंजोदारोंतील लोकांना रुद्राबद्दल प्रेम वाटत होतें, भीति वाटत नव्हती असें सिद्ध व्हायला

पाहिजे. शिवाय देवाची भीति वाटायला तो शत्रूचाच देव असायला पाहिजे असें नाहीं देवविषयक भावनांमध्यें भीति नेहमींच प्रमुख असते. एखाद्या देवाच्या वांट्याला भीतीचें प्रमाण जास्त आलें म्हणून तेवढ्यावरून तो शत्रूचा देव ठरत नाहीं. तेव्हां "शिस्नदेव" ह्या शब्दावरून कांहीं अनुमान निघत नाहीं.

### विलायती आणि गांवठी आर्य

तसेंच "पिशङ्ग" या शब्दाचा काळा असा अर्थ होत नाहीं. लालसर, तपकिरी असा अर्थ होतो. वाळलेल्या गव्हाच्या रंगालादेखील पिशङ्ग म्हणतां येईल. पण सर्वांत महत्त्वाचा मुद्दा असा, कीं ज्या इंद्राचा जयजयकार करून आर्य लोक "पिशङ्ग" "अनार्यां"शीं युद्ध करीत– असें सांगण्यांत येतें– तो इंद्रच स्वतः हरि वर्णाचा होता. दस्यूंच्या 'पिशङ्ग' वर्णाचें black असें भाषांतर करणारे संशोधक इंद्राच्या 'हरि' वर्णाचें मात्र tawny असें भाषांतर करतात, याला हातचलाखी म्हणावें कीं संशोधन, असा उद्विग्नपणें प्रश्न मनांत उभा राहतो. वस्तुतः पिशङ्ग व हरि हे साधारणपणें एकाच वर्णाचे वाचक आहेत. आर्यांचा हरि म्हणजे इंद्र जसा काळ्यांतच मोडणारा होता, त्याचप्रमाणें अनेक आर्य देखील काळेच होते, हें कण्वऋषींच्या उदाहरणावरून दिसून येतें.[१]

वेदांत काळ्यागोऱ्यांचें युद्ध नाहीं, त्याचप्रमाणें आर्य व अनार्य यांचेंच नेहमीं युद्ध असतें असेंहि नाहीं. "हे मन्यो तुझ्या साहाय्यानें आम्ही दास व आर्य अशा दोघांहि शत्रूंना जिंकूं."[२] "हे इंद्रा तुझ्या साहाय्यानें आम्ही दासांना व आर्यांना मारूं"[३] वगैरे ऋचांमध्यें दास व आर्य यांना एकाच शत्रुमालिकेंत गुम्फलेलें आहे. तेव्हां युरोपांतले खास गोरे आर्य भारतावर स्वारी करून यायच्या आधीच येथें काळे "नेटिव" आर्य वस्ती करून राहिलेले होते असें दिसतें!!

आर्य लोक भारताच्या बाहेरून आले असें प्रतिपादणाऱ्यांमध्यें दुर्दैवानें लो. टिळकांचेंही नांव आहे, व त्यांनीं "उत्तर ध्रुव" हें आर्यांचें मूलस्थान होतें हें निर्णायकपणें सिद्ध केलेलें आहे, असें अनेक लोक समजतात. म्हणून विषयपूर्तीसाठीं त्यांच्या ध्रुवसिद्धान्ताची चर्चा करणें आवश्यक आहे.

लो. टिळकांच्या सिद्धान्ताप्रमाणें देखील वेदांचीं सूक्तें रचणारे ऋषि स्वतःच उत्तरध्रुवावर राहत होते किंवा नुकतेच तेथून भारतांत आले होते असें नाहीं, तर त्यांचे फार प्राचीन पूर्वज उत्तर ध्रुवावर राहात होते. या फार प्राचीन काळचे तुरळक उल्लेख म्हणून लोकमान्यांनीं कांहीं वचनें उद्धृत केलीं आहेत. उदाहरणार्थ—

तानीदहानि बहुलान्यासन्या प्राचीनमुदिता सूर्यस्य ।
यतः परि जार इवाचरन्ति उषो दद्दक्षे न पुनर्यतीव ॥

यांतील पहिल्या ओळीचा अर्थ उषेच्या उदयापासून सूर्योदयापर्यन्त अनेक दिवस लोटून गेले असा करून, हें उत्तर ध्रुवावरच्या दीर्घ उषेचें वर्णन आहे, असें त्यांनीं प्रतिपादिलें आहे. पण या ओळीचा सरळ अर्थ उषा व उषेच्या मागून सूर्य उगवावा असे अनेक दिवस लोटून गेले असा होतो.

लोकमान्यांनीं उद्धृत केलेलें दुसरें वचन असें—

प्रपन्नोऽहं शिवां रात्रिं भद्र पारमशीमहि ।
रात्रिं रात्रिमरिष्यन्तस्तरेम तन्वा वयम् ।

"आतां रात्र झाली आहे. शरीराला कांहीं इजा न होता आमची प्रत्येक रात्र जावो."

"हा उत्तर ध्रुवावरील दीर्घ रात्रीचा उल्लेख आहे. कारण इथल्या लहानशा रात्रीचा पार दिसण्याबद्दल एवढी काळजी करण्याचें काय कारण आहे" असा लोकमान्यांचा युक्तिवाद आहे. पण "हेहि दिवस निघून जातील" असें दुःखानें आपण उत्तर ध्रुवावर न राहणारे लोक देखील म्हणतोच ना? तेव्हां याहि वचनावरून कांहींच सिद्ध होत नाहीं.

### एतद्देशप्रसूतस्य

टिळकांनीं उद्धृत केलेल्या सर्वच वचनांची येथें चर्चा करण्याचें कारण नाहीं. या वचनांचा अर्थ करण्यास उत्तर ध्रुवापर्यंत मजल मारण्याचें कांहींच कारण नाहीं, हें वाचकांना वरील दोन प्रातिनिधिक उदाहरणांवरूनच कळून येईल. तसेंच "वैदिक ऋषींचे पूर्वज फार पूर्वी उत्तर ध्रुवावर राहात होते, "वेदांतील राष्ट्रदर्शन" या पुस्तकांत आले आहेत.

१, २, ३ हे उल्लेख बाळशास्त्री हरदास यांच्या

२. सह्याम दासमार्यं त्वया युजा सहस्कृतेन सहसा सहस्वता. ३. यो नो दास आर्यो वा पुरुष्टादेव इंद्र युधये चिकेतति अस्माभिष्टे सुषहाः सन्तु शमनस्त्वया वयं तान्वनुयाम संगमे.



अनुक्रमणिका






तेथून ते केव्हांतरी भारतांत आले " असा स्पष्ट उल्लेख टिळकांना वेदवाङ्मयांत किंवा जगांतल्या कोणत्याहि वाङ्मयांत आढळलेला नाहीं. त्यामुळें " आर्यांचें मूलस्थान उत्तर ध्रुव हें होतें, असें लोकमान्यांनीं सिद्ध केलेलें आहे " हा एक लोकभ्रम आहे. " आर्यांची स्वारी " ही एक भाकडकथा आहे. हें पटण्याच्या मार्गांत लो. टिळकांचें नांव व त्यांचा ध्रुवसिद्धान्त ही सगळयांत मोठी अडचण आहे असें ज्यांना वाटत असेल, त्यांनीं टिळकांचा मूळ ग्रन्थ व त्याचें डॉ. अविनाशचन्द्र दास यांनीं आपल्या ' ऋग्वेदिक इंडिया ' या ग्रन्थांत केलेलें समर्पक खण्डन वाचावें, अशी माझी विनंति आहे.

भाषांचें वर्गीकरण अनेक प्रकारें होऊं शकतें व त्यावरून कोणतेंहि ऐतिहासिक अनुमान काढणें धोक्याचें आहे. पण संस्कृत व युरोपीय भाषा यांच्या साम्याची कांहींतरी उपपत्ति लावलीच पाहिजे असाच भाषावाद्यांचा आग्रह असेल, तर " आर्य भारताच्या बाहेरून आले " असें म्हणणाऱ्यावर बाजू उलटवणें सहज शक्य आहे. इंडोयुरोपीय भाषांतली सगळयांत प्राचीन व मूळ इंडोयुरोपीय भाषेशीं सगळयांत जुळणारी अशी भाषा संस्कृतच आहे, याबद्दल भाषाशास्त्रज्ञांचें बहुमत आहे. लिथुआनियन भाषेचा तोंडवळा मूळ इंडोयुरोपीय भाषेशीं अधिक जुळतो असें म्हटलें जातें, पण या भाषेंत वेदाशीं समकालीन म्हणतां येईल असें वाङ्मय उपलब्ध असल्याचें ऐकिवांत नाहीं. इंडोयुरोपीय भाषांतलें वेद हेंच सर्वांत प्राचीन वाङ्मय आहे. हें वाङ्मय भारतांतच निर्माण झालें या बाबतींत कांहीं तुरळक अपवाद सोडल्यास आर्यांना अभारतीय मानणाऱ्या पंडितांची देखील एकवाक्यता आहे. तेव्हां आर्यभाषा भारताबाहेर आढळत असतील तरी त्या वेदांच्याहि पूर्वीच्या आहेत हें सिद्ध झाल्याशिवाय वैदिक भाषेचें मूळ भारताबाहेर शोधणें हास्यास्पद आहे. उलट, **युरोपीय आर्यभाषा भारतीय संस्कृताच्या नंतरच्या असल्यामुळें त्या संस्कृतोद्भव आहेत व संस्कृतभाषी आर्यलोक भारतांतूनच बाहेर गेले असें सरळ अनुमान भाषावाद्यांनीं काढायला पाहिजे.** आर्यभाषा संख्याधिक्यानें कुठें आढळतात, यापेक्षांहि सर्वांत प्राचीन आर्यभाषा सर्वप्रथम कोणत्या देशांत आढळते, हाच मुद्दा आर्यांचें मूलस्थान शोधण्याच्या मार्गांत अधिक निर्णायक आहे.

---










# मापण्यासाठी मेट्रिक परिमाणांचाच वापर करीत चला



दिल्लीच्या केंद्रशासित प्रदेशामध्ये १ एप्रिल १९६१ पासून मापण्याच्या मेट्रिक परिमाणांचा वापर सक्तीचा झालेला आहे.

देशाच्या इतर भागांतील काही निवडक क्षेत्रांत मेट्रिक परिमाणें सुरु झाली असली तरी जुन्या वजनामापांच्या वापराला एक वर्षपर्यंत मोकळीक देण्यात आली आहे.

आकारमापनाचे
मुख्य परिमाण म्हणजे
लिटर

१ लिटर =
१.१ शेर (जवळ जवळ)

## मेट्रिक पद्धति

*साम्य व सरलतेसाठी*

भारत सरकार द्वारा प्रकाशित

DA 61/109 MAR

अनुक्रमणिका








## पुस्तक-परामर्श –

**बोरकरांची कविता–** संपादन : मंगेश पाडगांवकर, मौज प्रकाशन, मुंबई ४; किंमत १५ रुपये.

बोरकरांनीं आपली पहिली कविता वयाच्या सोळाव्या वर्षी-म्हणजे १९२६ सालीं लिहिली आणि प्रस्तुत समग्र काव्यसंग्रहांतील त्यांच्या अखेरच्या कवितेची तारीख आहे. १४–१०–६०. तब्बल ३४ वर्षें बोरकर काव्यलेखनाचा प्रपंच करीत आले आहेत. या ३४ वर्षांत त्यांच्या काव्यावर एवढें अमाप ( पुष्कळदां वाजवीपेक्षां अधिक ) लिहिलें गेलें आहे कीं आतां नव्यानें त्यावर कांही लिहिण्यासारखें कांहीं राहिलें असेल असें वाटत नाहीं. बोरकरांनीं मराठी कवितेला संगीताचा साज चढविला, ललितरम्य शब्दांचीं आभरणें तिला प्राप्त करून दिलीं, बालकवींच्या निसर्गकवितांपासून स्फूर्ति घेऊन त्यांनीं ' गोव्याचा ' नित्य-नूतन निसर्ग शब्दरूप केला, तांब्यांच्या पावलावर पाऊल टाकून त्यांनीं नव्या थाटाच्या प्रेमकविता, भावकविता लिहिल्या एवढी त्यांच्या काव्यप्रपंचाची गोळाबेरीज सांगण्यांत येते. स्विनबर्नच्या ' शिलकी पत्राशीं ' ' Balance Sheet ' ही गोळाबेरीज बरीचशी जुळण्यासारखी आहे. आंग्ल कवितेंत स्विनबर्ननें जें कार्य केलें तेंच बोरकरांनीं मराठी कवितेंत केलें असें फार तर आपण म्हणूं शकूं. रविकिरण मंडळाचें सोंगटें बाद करून त्यांनीं बालकवि-तांब्यांची परंपरा आपल्या परीनें १९६० पर्यंत ताणत आणली हें त्यांच्या काव्यप्रपंचाचें तात्पर्य म्हणून सांगण्यास प्रत्यवाय नाहीं. इथेंच त्यांच्या कवितेचे विशेष संपुष्टांत येतात आणि अनेक मर्यादांच्या, उणीवांच्या प्रचंड भिताडांनीं त्यांचें काव्य बंदिस्त होतें. प्रस्तुत काव्यसंग्रहांतील त्यांची ' जळण्यातहि सुख आहे ' ही अखेरची कविता कसाला लावून पाहिली तर गेल्या ३४ वर्षांच्या प्रदीर्घ कालावधींत बोरकरांच्या कवितेनें आपली चाल एकाच सरळ रेषेनें केली आहे असें आढळून येईल. आशयाच्या दृष्टीनें पाहिलें असतां त्याच त्याच विषयांची मात्रा ती उगाळीत बसल्याचें दिसतें आणि अभिव्यक्तीच्या बाबतींतहि तिचीं आवर्तनें फारसें नावीन्य दाखवीत नाहींत.

प्रस्तुत काव्यसंग्रहाचें संपादन मंगेश पाडगांवकरांनीं केलें आहे. त्यांनीं संपादन केलें आहे म्हणजे नक्की काय केलें आहे याचा मात्र कांहींच पुरावा कोठें आढळत नाहीं. ' प्रतिभे'पासून ' चित्रवीणे ' पर्यंतचे पांच कवितासंग्रह या काव्यसंग्रहांत समाविष्ट करण्यांत आले आहेत आणि पूर्वीच्या काव्यसंग्रहांत नसलेल्या ३४ नव्या कवितांचा अंतर्भाव करण्यांत आला आहे. शिवाय कविवर्यांचें एक छायाचित्र, त्यांच्या हस्ताक्षराचा नमुना, वेळोवेळीं आपल्या काव्यसंग्रहांना त्यांनीं लिहिलेलीं प्रास्ताविकें, अर्पणपत्रिका, त्यांच्या जीवनांतील महत्त्वाच्या घटनांचे सनवार उल्लेख, त्यांच्या आजवरच्या साहित्यनिर्मितीची समग्र यादी, कवितांच्या पहिल्या ओळींची सूचि इत्यादींनीं हा काव्यग्रंथ अगदीं exhaustive ( झाडून भरलेला ) करण्यांत आला आहे.

मात्र ज्या कवितांत ' फिकट ' पुनरुक्ति वाटली किंवा ज्या कविता फार ' कच्च्या ' वाटल्या अशा सातआठ कविता बोरकरांच्या संमतीनें सुद्धां वगळण्याची आवश्यकता होती असें वाटत नाहीं.

या संग्रहाला जोडण्यांत आलेली संवादात्मक प्रस्तावना एवढीच एक नवी गोष्ट. ही संवादात्मक चर्चेची टूम ' Writers at their Disks ' या पुस्तकावरून घेण्यांत आली आहे हें उघड आहे. ( साहेब करतो तें आपणहि केल्याशिवाय आपण अद्ययावत् कसे होणार ? ) बोरकरांच्या कवितेबाबत जेवढ्या जेवढ्या म्हणून शंका ( आणि कुशंका ) येण्यासारख्या होत्या तेवढया साऱ्या पाडगांवकरांनीं अगदीं खुल्या दिलानें त्यांच्यासमोर मांडल्या आहेत आणि कधीं त्यांना धारेवर धरीत, कधीं त्यांची उलटतपासणी घेत असल्याचा आविर्भाव आणीत, कधीं त्यांना चुचकारीत, कधीं त्यांच्या ध्यानींमनींहि नसलेल्या गोष्टी सुचवीत बोरकरांच्याच तोंडून त्यांनीं त्यांच्या काव्यप्रक्रियेचें स्वरूप वदविलें आहे. ' मार्गारीदनं पटकन् माझा मुका घेतला ! -आणि हंसत हंसत ती खाली पळाली. माझ्या भोंवतालचं सारं जग एका क्षणांत पालटलं... ' असं आत्मनिवेदन बोरकरांनीं करतांच पाडगांवकर म्हणतात : बोरकर, हें स्वप्न सांगितलंत कीं वस्तुस्थिति ! मला तर सारखा हेवा वाटत होता, हें सारं ऐकतांना ! एकूण हें तुमचं दुखणं बरंच जुनं आहे तर ! !–यावर कुणी विचारील कीं याचा नि बोरकरांच्या कवितेचा संबंध काय तर त्याला देण्यासारखें असें एकच उत्तर कदाचित्



अनुक्रमणिका








पाडगांवकर देऊं शकतील अन् तें म्हणजे-बाबारे, प्रस्तावना अधिक lively (अलीकडे पाडगांवकर इंग्रजी शब्दांचाहि जाणीवपूर्वक उपयोग आपल्या लेखनांत करूं लागले आहेत ही गोष्टहि या प्रस्तावनेच्या निमित्तानें लक्षांत यावी. उदा० cliches चं दर्शन, समुचित gallantry फेकणं, self-hypnosis, आकाराच्या (form च्या) करण्याचा हा प्रयत्न आहे!

बोरकर इंग्रजी तिसरींत असतांना हें 'मार्गारीद प्रकरण' घडलं. 'मानसशास्त्राच्या परिभाषेंत ज्याला psychological fixation म्हणतात, तसा 'कांहींसा' प्रकार माझ्या मनोधर्माच्या बाबतींत झाला असावा' असं बोरकर म्हणतात. पण असें कांहीं घडलें असेल याचा कांहींच सुगावा १९३० सालीं प्रसिद्ध झालेल्या आपल्या संग्रहांत कां लागत नाहीं याचा खुलासा मात्र ते करीत नाहींत. या psychological fixation चा आपल्या समग्र काव्यावर काय परिणाम झाला हेंहि त्यांनीं उदाहरणें देऊन दाखविलें असतें तर बरें झालें असतें. केशवसुतांच्या काव्याचा आपल्यावर फारसा परिणाम झाला नाहीं आणि १९२६ ते ३० सालच्या दरम्यान आपण Golden Treasury आणि शेले, कीटस्, बायरन् आणि टेनिसन् हे कवि विशेष आवडीनें वाचले हें बोरकरांचें निवेदन त्यांच्या सर्वच काव्यसंभाराचें स्वरूप समजावून घेण्याच्या दृष्टीनें महत्त्वाचें असलें तरी Golden Treasury आणि इतर उल्लेखित कवि यांचा आपल्या काव्यलेखनावर नेमका परिणाम काय झाला हें त्यांनीं या संदर्भांत सांगणें अगत्याचें होतें. पण तसा प्रश्न विचारावयाचें पाडगांवकरांनाहि सुचूं नये याचें आश्चर्य वाटतें. 'कातरवेळेनंतर' या एका कवितेचा अपवाद सोडला तर संतकाव्याचे संस्कार 'प्रतिभे'तल्या कवितेवर कुठंच जाणवत नाहींत असं विधान पाडगांवकर करतात. पण या काव्यसंग्रहांतील 'बाष्पसमर्पण', 'गरिबाची पुष्पांजलि', 'श्रीकृष्णवंदन' या कविता ते आणि स्वतः बोरकरहि सोईस्करपणें विसरतात. कीं याहि कविता 'भावातिरेकाच्या असावध क्षणांत निर्माण झाल्या असाव्या' असें बोरकरांना वाटतें? भावातिरेकाचा 'असावध' क्षण म्हणजे काय? हा क्षण असावधतेचा असतो मग कवि त्या क्षणी कविता कशी करतो? तसें पाहिलें तर सर्वच कलेची निर्मिती अशा 'असावध' क्षणीं होत नाहीं काय? याहि प्रश्नांचा खल बोरकर-पाडगांवकरांनीं करावयास हवा होता. ही चर्चा चालूं असतांना संतकाव्याचे संस्कार 'प्रतिभे'तील काव्यांत कां दिसत नाहींत याचें कारण पाडगांवकर बोरकरांना सुचवितात. 'अभंग लिहायचा नाहीं म्हणजे संतांच्यासारखी रचना करायची नाहीं असें मी माझ्या मनाला पटविलें असावें' हें बोरकरांचें आत्मनिवेदन पाडगांवकरांना अपुरं वाटतं- नव्हे, त्यांना तें पटतच नाहीं. ते बोरकरांना म्हणतात, तुम्हीं त्यावेळीं बालकवि, टिळक, गोविंदाग्रज, गोविंद यासारख्या कवींच्या अनुकरणांत रंगला होता म्हणून असें झालें.- आणि बिचारे बोरकर! ते पाडगांवकरांच्या म्हणण्याला मान तुकवितात. खरें म्हणजे संस्कार ही गोष्टच मुळांत इतकी गुंतागुंतीची आणि संमिश्र स्वरूपाची आहे कीं पाडगांवकर करतात त्याप्रमाणें त्याचें शवविच्छेदन केल्यानें त्याचें सत्य स्वरूप समजण्याचा सुतराम् संभव नाहीं. एखादा कवि जेव्हां आपल्यावर संतकाव्याचा संस्कार झाला असें म्हणतो तेव्हां त्याच्या काव्यांतून केवळ याच काव्याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न करणें हें मूलतः चुकीनें असतें. त्याचें म्हणणें एवढेंच असतें कीं एका विशिष्ट कालांत तो संतकाव्याचें अध्ययन कळत न कळत करीत होता आणि कदाचित् याचा परिणाम आपल्या काव्यावर झाला असावा. प्रत्येक माणसाप्रमाणें कलावंताच्या मनावरहि वेगवेगळ्या घटनांचे, गोष्टींचे संस्कार एकसमयावच्छेदेंकरून होत असतात आणि अशा प्रकारें होणाऱ्या संस्कारांतून त्याची स्वतःची अशी प्रतिभा फुलत असते. 'प्रतिभे'त संतकाव्याचे पडसाद दिसत नाहींत ही पाडगांवकरांची समजूतच आधीं चुकीची आहे आणि क्षणभर ती बरोबर आहे असें धरून चाललें तरी त्यामुळें बोरकरांचें आत्मनिवेदन चुकीचें ठरत नाहीं.

याच चर्चेच्या संदर्भांत पाडगांवकर 'सूक्ष्मतरल इंद्रियसंवेदना टिपून त्यांतून सौंदर्याकृति निर्माण करण्याची' ताकद दाखविल्याबद्दल बालकवींचे गोडवे गातात आणि हें करीत असतांनाच 'शब्दांची क्रीडा करणारी गोविंदाग्रजांची भव्योत्कट कल्पनाशक्ति इतरांजवळ नसल्याबद्दल दुःख व्यक्त करतात.








आपली काव्याविषयीचीं कल्पना पाडगांवकरांनी ही संवादात्मक प्रस्तावना लिहिण्यापूर्वी घासून तपासून घेतली असती तर काव्य म्हणजे केवळ सूक्ष्मतरल इंद्रियसंवेदना टिकण्याचें सामर्थ्य नव्हे, तसेंच शब्दांची क्रीडा करणारी भव्योत्कट कल्पनाशक्तिहि नव्हे हें त्यांच्या सहजच लक्षांत आलें असतें. ( निदान यावयास हवें होतें. ) बालकवि-गोविंदाग्रजांनीं आपल्या काव्यांतून व्यक्त केलेले अनुभव मोठे जगावेगळे होते असें नाहीं. विचारांच्या दृष्टीनेंहि या उभयतांचें काव्य नावीन्यपूर्ण होतें असें म्हणतां येणार नाहीं. कवि या नात्यानें त्यांचा मोठेपणा एवढाच मानतां येईल कीं त्यांनीं आपल्या अनुभवांतून कलात्मक सौंदर्याकृति निर्माण केल्या. ही किमया कलावंताला प्रारंभापासूनच साध्य होते असें नाहीं. आणि म्हणूनच बालकवि–गोविंदाग्रजानंतर उदीयमान होऊं घातलेल्या सर्वच कवींना त्यांच्यांत बालकवींची ताकद नव्हती. ‘ ललित-लुलित ’ शब्दांत बांधलेल्या उपमाउत्प्रेक्षांच्या उतरंडीच काव्य म्हणून खपत होत्या. त्यांच्याजवळ होता तो अनुप्रासयुक्त शब्दांचा पोकळ, ‘पोरका खेळ ’ अशा शब्दांनीं हेटाळावयास नको होतें. पाडगांवकरांनीं स्वतः आपल्या ‘ धारानृत्या’कडे किंवा अलीकडच्या कवितांकडे निःपक्षपातीपणें नजर टाकल्यास आपण अजूनहि असेंच कांहीं करीत आहोंत असें आढळून येईल.

बोरकरांच्या “ प्रतिभेंतील काव्यांत संतकाव्याचे पडसाद आढळत नाहींत याची पाडगांवकरांनीं केलेली मीमांसा केवळ अपुरीच नव्हे तर चुकीचीहि आहे वर सांगितल्याप्रमाणें आधीं ती वस्तुस्थिति नाहीं, आणि तसें नाहीं असें गृहीत धरलें तरी केवळ बोरकर हे तत्कालीन नामवंत कवींचें अनुकरण करीत होते म्हणून असें घडलें हें विधानहि पटण्यासारखें नाहीं. आपल्यावर संतकाव्याचे खोल संस्कार झाले होते” असें बोरकर सांगतात, पण केवळ इतरांच्या अनुकरणामागें लागल्यामुळें या संस्कारांचा त्यांना विसर कसा पडतो या प्रक्रियेचें पृथक्करण पाडगांवकर करीत नाहींत. ‘ काव्याची निर्मिति पुष्कळशी अंतर्मनाच्या गूढ प्रक्रियेनुसार होत असते ’ एवढेंच त्यांना काव्यप्रक्रियेविषयीं सांगावयाचें आहे असें दिसतें. काव्यनिर्मितिप्रक्रियेवर ते फारसा नवा प्रकाश टाकूं शकत नाहींत.

बोरकरांच्या समकालीन इतर कवींची प्रच्छन्न हेटाळणी करून झाल्यावर पाडगांवकर बोरकरांच्या कवितेकडे वळतात आणि आपल्या हेटाळणीच्या जाळ्यांत अडकलेल्या बोरकरांची बेमालूम सुटका करतात. इतर कवी ‘ वाङ्मयीन संकेतांच्या शेवाळाखेरीज कांहीं निर्माण करूं शकले नाहींत ’ हें विधान बोरकरांच्या कवितेला लागावयास काय हरकत आहे ? पाडगांवकर तसें ते लावतातहि, पण लगेच या बोटावरची थुंकी त्या बोटावर करून ते म्हणतात : “ तुमची ‘ प्रतिभा ’ या संग्रहांतली कविता माझं लक्ष वेधून घेते. कारण त्या कालखंडांतल्या वाङ्मयीन प्रवाहाचं, संकेतांचं, clichesचं दर्शन मला ती वाचीत असतांना होतं. हें दर्शन मला वाटतं फार महत्त्वाचं आहे. कारण कोणत्या नव्या दिशेनं कवींना आपलं व्यक्तिमत्त्व प्रकट करणं भाग होतं त्याची सूचना यांतून मिळते. ” हें दर्शन पाडगांवकरांना तत्कालीन कवितेंत फक्त बोरकरांच्याच काव्यांत आढळावें आणि इतर कवींच्या माथ्यावर मात्र त्यांनीं हेटाळणीचें खापर मारावें ही गोष्ट न्यायाची आहे असें वाटत नाहीं. दुसरें असें कीं, असें दर्शन होणें हा त्या काव्याचा एक गौण उपयोग झाला. बोरकरांच्या तत्कालीन कवितेवर स्पष्टपणें बोलण्यासारखें असें पाडगांवकरांना कांहीं गवसूं नव्हे ही खेदाची गोष्ट आहे. ‘ प्रतिभा ’ संग्रहांतील कविता ते बोरकरांबरोबर वाचावयाची इच्छा प्रदर्शित करतात तीसुद्धां त्या काव्याचें सौंदर्यस्वरूप समजून घेण्यासाठीं नव्हे तर त्या कालखंडांतलं मराठी काव्यांतल्या संकेतांचं स्वरूप समजून घेण्यासाठीं. ‘ प्रतिभे ’-तील प्रेमकविता आणि निसर्गकविता ‘ कचकड्याच्या ’ होत्या यावर बोरकर पाडगांवकरांचें एकमत होतें आणि ही संवादात्मक चर्चा ‘प्रादेशिक’तेकडे वळते. या चर्चेच्या ओघांत बोरकर म्हणतातः ‘ गांधीजींच्या विचारामुळं प्रादेशिक अस्मितेची राजकीय जाणीव गोव्यासारख्या प्रदेशांना होऊं लागली होती. अभावितपणे ती त्यावेळीं साहित्यक्षेत्रांतहि मूळ धरूं लागली असणं शक्य आहे ? या विधानाच्या राजकीय अंगावर चर्चा करण्याचें हें स्थल नसलें तरी ‘ प्रादेशिक ’ तेकडे बोरकर गांधीजींच्या नांवाचा बेलभंडारा घेऊन कोणत्या दृष्टीनें पहातात हें लक्षांत घेण्यासारखें आहे. प्रादेशिक अस्मितेची राजकीय जाणीव म्हणजे काय ?

गांधीजींच्या कोणत्या विचारामुळें ही जाणीव ‘ गोव्या-सारख्या प्रदेशांना ’ होऊं लागली होती, गोव्यासारखे प्रदेश म्हणजे कोणकोणते प्रदेश याचें दिग्दर्शन बोरकरांनीं येथें करणें अगत्याचें होतें. बोरकर हा वाद केवळ वाङ्मयीन स्वरूपाचा ठेवूं इच्छीत नाहींत हें उघड आहे. गोवा हें एक स्वतंत्र राष्ट्र आहे हें बोरकरांच्या विधानांत सूचित आहे. ‘यापुढें मराठींत एक अवाक्षर लिहिणार नाहीं’ अशी जाहीर घोषणा गोमंतक साहित्यसंमेलनाच्या व्यासपीठावरून बोरकरांनीं केली होती हें प्रसिद्ध आहे. बोरकरांचीं या बाबतचीं मतें स्पष्टपणें विचारावयाचा ऐन मोका आला असतां– अगदीं वाङ्मयीन प्रश्नाच्या संदर्भांत आला असतां पाडगांवकरांनी हें अरिष्ट टाळ-ण्यांत दाखविलेला व्यवहारचतुरपणा वाखाणण्यासारखा आहे.

---

‘ जीवनसंगीतां’तील कवितांविषयीं या कविद्वयानें केलेली चर्चा मात्र बरीच समाधानकारक आहे. काव्य-विषयक ‘ पृथगात्मक’तेच्या प्रश्नावर हॉपकीन्सचा निर्वाळा देऊन पाडगांवकरांनीं बोरकरांना नेमकें कैचींत पकडलें आहे आणि यावर देण्यासारखें असें उत्तर बोरकरांपाशीं अर्थातच नाहीं. ‘ प्रादेशिक निसर्गकविता असूं शकते का ? ’ या प्रश्नाला बोरकरांनीं दिलेलें उत्तरहि असेंच साखासारवीचें आहे. ते म्हणतात : “ प्रत्येक भूभागांतील निसर्गाला स्वतःचा असा खास Persona असतोच. तो खऱ्या निसर्गकवीला स्वभावतःच जाणवतो आणि त्याच्या कवितेंतून आपातत: प्रकट होतो. त्या दृष्टीनं कोणतीहि अस्सल निसर्गकविता प्रादेशिकच असते ” याचाच अर्थ असा कीं कोणतीहि निसर्गकविता किंवा कलाकृति ‘ प्रादेशिक ’ अशी नस-तेच. ती कांहीं असली तर निसर्गकविता असते किंवा कलाकृति असते. ‘ प्रादेशिक’ता हें तिला जोडण्यांत येणारं एक व्यवहाराचं ठिगळ तेवढं असतं. बोरकरांच्या कवितेंत गोव्यांतील निसर्ग अनुस्यूत असला तरी त्या-मुळेंच केवळ त्यांच्या कवितेला ‘ आगळेंपण ’ आलें आहे असें म्हणतां येणार नाहीं. तेव्हां साहित्यांतील ‘ प्रादेशिक’तेला वाङ्मयीन मूल्याचें महत्त्व देण्याचें कारण नाहीं. पु. शि. रेग्यांच्या कांहीं निसर्गकविता स्वित्सर्लंडमध्यें लिहिल्या गेल्या आहेत म्हणूनच केवळ त्या वेगळ्या आहेत असें कुणी मानीत नाहीं तसेंच बोरकरांच्या गोव्यांतील निसर्गवाचक कवितांबद्दल म्हटलें पाहिजे. बालकवींच्या कवितेंत प्रादेशिकता आढळत नाहीं याचें कारण ती अस्सल मराठी निसर्गावरील कविता आहे. मराठीहून वेगळी राजकीय अस्मिता ती मानीत नाहीं. गोव्यांतील काय, पुणें–नाशिक-कडील काय किंवा नागपूरकडील काय–सगळा निसर्ग बालकवींच्या कवितेला वेगवेगळा दिसत नाहीं. ‘ प्रादेशिक’तेचें भांडवल करण्याची आवश्यकताहि बालकवींना कधीं वाटली नाहीं.

चर्चेचा यापुढील बराचसा भाग आत्मनिवेदनात्मक असल्यामुळें त्यावर लिहिण्यासारखं असं फारसं कांहीं नाहीं. मध्येंच चर्चेचा ओघ- कांहीं कारण नसतांना– दोन प्रश्नांकडे वळतो. पहिला प्रश्न : कलावंतावर सामाजिक किंवा राजकीय नियंत्रण असावं कीं नाहीं ? आणि दुसरा : केवळ काव्यलेखनावर कवि आज आप-ल्याकडे जगूं शकेल का ? पहिल्या प्रश्नाला बोरकरांनीं आपल्या नेहमींच्या पद्धतीनें उडवाउडवीचेंच उत्तर दिलें आहे. त्यांचें मत असें दिसतें कीं, सामाजिक व राजकीय नियंत्रणें आणि ‘ आदर्श मुक्तीकडे ’ धांवणारा कलावंत यांच्यांतील मूल्यकलह अटळ आहे आणि **त्यांतच त्याचा आणि समाजाचा विकास** आहे. याचाच अर्थ असा कीं, कलावंताच्या विकासाच्या दृष्टीनें अशीं बंधनें असणें अत्यावश्यक आहे. आकाश-वाणीकडून लेखकाला येणाऱ्या ‘ कंत्राट ’ फॉर्मावर दिवसेंदिवस वाढतीं बंधनें कां घालण्यांत येत आहेत याचा कांहींसा खुलासा बोरकरांच्या या दृष्टिकोणाद्वारें सूज्ञांना व्हावा.

कवीची आर्थिक परिस्थिति चांगली असणें हेंहि त्याच्या काव्यनिर्मितीला विघातक आहे असें बोरकरांचें मत दिसतें. आकाशवाणीवर लागल्यापासून त्यांनीं केलेली काव्यरचना या एकाच कारणासाठीं कुणी हिणकस ठरविली तर बोरकरांना त्याविरुद्ध कांहीं म्हणतां येईल असें वाटत नाहीं. मराठी नियतकालिकांच्या मालकांनीं साहित्याला आणि विशेषतः कवितांना ‘ मानधन ’ देण्याचें तावडतोब थांबविल्यास साहित्याचा एकूण दर्जा वाढविण्यास ते कांहीसा हातभार लावूं शकतील असें वाटतें. शुभस्य शीघ्रम्.

अनुक्रमणिका






बोरकरांच्या कांहीं निवडक कविता, काव्यनिर्मितीची पूर्वीची आणि आजची प्रक्रिया, इ. बाबीसंबंधीं थोडीशी बातचीत करून हें ४३ पानांचें एक अंकी नाटक अखेर संपतें आणि वाचकाचा जीव भांड्यांत पडतो !

एवढा मोठा प्रपंच करण्याएवढें बोरकरांचें काव्य केव्हांच मोठें नसल्यामुळें या प्रचंड संवादांतून अखेर कांहींच हातीं लागत नाहीं यांत नवल तें काय ?

पंधरा रुपये किंमतीचा मराठींतील पहिलाच कवितासंग्रह ( सुबक छपाई–मोहरेदार कागद– फ्रेम करून ठेवण्याजोगें बोरकरांचें छायाचित्र इ. अनेक गोष्टींसह ) म्हणून या पुस्तकाचें महत्त्व राहील. कदाचित् येत्या कांहीं वर्षातच हें पुस्तक बी. ए., एम्. ए. च्या विद्यार्थ्यांना अभ्यासावें लागेल. त्यांना हवी असलेली सर्व कांहीं माहिती या पुस्तकांत मिळण्याची सोय करण्यांत आली आहे.

---



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष